बाणभट्टकृत.

दक्षिणा प्रैज कमितीनें बक्षिसें दिलेल्या ग्रंथांची माला,
नंबर ५.

# पार्वतीपरिणय नाटक

याचें प्राकृत भाषांतर,

## परशुराम बल्लाळ गोडबोले

ह्यांनीं केलें
(पुणें, इ. सन १८६९–शके १७९०.)
तें

विष्णु परशराम शास्त्री पंडित
यांनीं तपासून
मे. दैरेक्टर आफ् पब्लिक इन्स्त्रक्शन व
मे. दक्षिणा प्रैज कमितीचे अध्यक्ष
यांच्या परमानगीनें

मुंबईंत
इंदुप्रकाशाच्या मालकांनीं आपल्या छापखान्यांत
छापून प्रसिद्ध केलें.

सन १८७२.–शके १७९४.

(हा ग्रंथ १८६७ च्या २५ व्या आक्ताप्रमाणें नोंदिला आहे.)
किंमत १० आणे.




# प्रस्तावना.

काव्य दोन प्रकारचें आहे. एक श्राव्य आणि एक अभिनेय. श्राव्य ह्मणजे केवळ श्रवणमात्रेंकरून मनोरंजन करणारें रघुवंशादिक, आणि अभिनेय ह्मणजे पूर्वीं झालेली जी कृति तिच्या अभिनयानें ह्म० हावभाव दाखविण्यानें वर्तमानकाळीं रसोत्पत्तिद्वारा मनोरंजन करणारें शाकुंतलादिक. जे जे महाकवि होऊन गेले त्यांनीं त्यांनीं अभिनेय काव्यें करून ठेविलीं आहेत. त्यांलाच नाटक, नाटिका, रूपक, प्रकरण, भाण इत्यादि संज्ञा ठेविल्या आहेत.

त्या कवींमध्यें बाण ह्या नांवाचा प्रसिद्ध महाकवि होऊन गेला त्यानें हें पार्वतीपरिणय नांवाचें नाटक संस्कृत भाषेंत करून प्रसिद्ध केलें. हें नाटक प्रगल्भ व सरस असून सुलभ आहे. ह्यांत संविधानाची पूर्णता, रसांची परिपुष्टि, संदर्भाची चतुराई, आणि सभ्यांची मनोरंजकता हे गुण असावे तसे आहेत. ह्यांत पार्वतीचा विवाह निरूपिला आहे.

१ त्या नाटकांतील रसलाभ संस्कृतभाषाभिज्ञ पुरुषांस होत आहे. तो रसलाभ प्राकृतजनांस व्हावा ह्या उद्देशानें त्याचा उतारा देशभाषेंत केला आहे. मूलग्रंथांत असल्याप्रमाणें या भाषांतरांत पांच अंक ह्मणजे पांच भाग निरनिराळे केले आहेत—गद्याचे ठिकाणीं गद्य पद्याचे ठिकाणीं पद्य अनुक्रमानें केलें आहे. तथापि संस्कृत भाषेची योग्यता प्राकृत भाषेस नाहीं यामुळें, आणि भाषांतरकर्त्यास ज्ञानशक्ति, प्रतिभाशक्ति आणि कवनशक्ति तादृश नसल्यामुळें मूळग्रंथाप्रमाणें ह्या भाषांतरांत रसनिष्पत्ति झाली नाहीं खरी; तथापि पूर्णचंद्रदर्शनानें जो संतोष होतो तो कदाचित् चंद्रकलादर्शनानें लोक मानून घेतात. त्या न्यायानें ह्या भाषांतरांतील अल्प रस सेवून रसिक जन संतोष मानून घेतील अशी भाषांतरकर्त्यास आशा आहे.

वर सांगितलेल्या नाटकाचा कर्ता बाणकवि असें ह्मटलें, पण ज्या बाणकवीचा कादंबरी नामक प्रसिद्ध ग्रंथ आहे, तोच हा बाणकवि किंवा त्या नांवाचा दुसरा कोणी बाणकवि झाला ह्याविषयीं संशय येतो. तरी तोच बाणकवि हा असें ह्मणण्यास एक सबळ प्रमाण हें दिसतें कीं, कादंबरी

ग्रंथाच्या आरंभीं वंशवर्णनांत "बभूव वात्स्यायनवंशसंभवो द्विजो जगद्गीतगुणोऽग्रणीः सतां" असें लिहिलें आहे. आणि या काव्यांत सूत्रधाराची उक्ति आहे कीं, "अस्ति कविसार्वभौमो वत्सान्वयजलधिसंभवो बाणः" यावरून वत्सान्वयशब्दसादृश्यानें तोच बाणकवि या नाटकाचा कर्ता असें दिसून येतें.

प० ब० गो०

# पार्वतीपरिणय नाटक.

या पुस्तकांत संस्कृत मूळग्रंथ आणि त्याचें प्राकृत भाषांतर अशीं दोनही छापिलीं आहेत. डाव्या पृष्ठावर संस्कृत आणि त्याच्या समोर उजव्या पृष्ठावर प्राकृत असा क्रम धरिला आहे.

# ॥ पार्वतीपरिणयनाटकम् ॥

॥ संस्कृतम् ॥

## ॥ अंकः १ ॥

मंगलश्लोकः ।

आदौ प्रेमकषायिता हरमुखव्यापारलोला शनै-
र्व्रीडाभारविघूर्णिता मुकुलिता धूमोद्गमव्याजतः ।
पत्युः संमिलिता दृशा सरभसव्यावर्तनव्याकुला
पार्वत्याः परिणीतिमंगलविधौ दृष्टिः शिवायास्तु नः ॥१॥

अपि च । गीतिः ।

संपदमतरललभ्यामनन्यसामान्यबहलदर्पनिधेः ।
पुष्णातु चित्तयोनेरघटितघटनापटीयसी विभुता ॥ २ ॥

# पार्वतीपरिणय नाटक.

मराठी.

## अंक १.

मंगलश्लोक.

आधीं प्रेमभरें करूनि भरली देखावया लोभली
शंभूचें मुख लाजली मग धुरें झांकोनि जी शोभली ।
दृष्टीशीं पतिच्या फिरोनि मिळतां [1]भागे परावर्तना
दृष्टी पार्वतिची विवाहसमयीं ती सौख्य देऊ जना ॥१॥

आणखी आर्या.

[2]शृंगारसंपदेतें अ[3]नन्यसामान्यगर्वसदनाचें ।
पुष्ट करो तरुणांच्या [4]अघटितघटनापटुत्व मदनाचें ॥ २ ॥
( मंगलाचरण झाल्यावर सूत्रधार येतो. )

---

१ मागें फिरावयास न शके. २ तरुणांच्या शृंगारसंपदेतें. ३ अलौकिक गर्वाचें घर मदन. ४ न घडणारी गोष्ट घडविण्याचें सामर्थ्य.

नांद्यंते सूत्रधारः । सप्रणयमंजलिं बध्वा ।

श्लोकः ।

ब्रह्मस्तंभकुटुंबस्य योगक्षेमविधायिनौ ।
आनंदविग्रहौ भूत्यै भूयास्तामादिदंपती ॥ ३ ॥

इति पुष्पांजलिं विकीर्य नेपथ्याभिमुखमवलोक्य । आर्ये इतस्तावत् ।

प्रविश्य नटी । अज्ज इ अह्मि । (१)

सूत्रधारः । आर्ये अद्य खलु किमप्यभिनवं पार्वतीपरिणयं नाम रूपकं द्रष्टुमभिलषति परिषदेषा ।

नटी । अज्ज तं उण कस्स कइणो किदी हुविस्सदि । (२)

आर्या ।

सूत्र० । अस्ति कविसार्वभौमो वत्सान्वयजलधिसंभवोबाणः ।
नृत्यति यद्रसनायां वेधोमुखलासिका वाणी ॥ ४ ॥

तद्विरचितेन विचित्रसंविधानेन वस्तुनानेन सामाजिकानुपस्थास्यामहे ।

---

१ आर्ये इयमास्मि ।
२ आर्ये तत्पुनः कस्य कवेः कृतिर्भविष्यति ।

**सूत्रधार**.—( विनयानें अंजलींत पुष्पें घेऊन )

आर्या.

**जे विश्वकुटुंबाच्या योगक्षेमास नित्य चालविते**
**ते आदिदंपती[1] म्यां आठविले भक्तविघ्नघालविते ॥ ३ ॥**

(असें ह्मणून पुष्पांजलि शिवास अर्पितो.) (पडद्याकडे पाहून) आर्ये, इकडे ये.

**नटी**.—( प्रवेश करून ) आर्या, ही मी आल्यें.

**सूत्र०**.—आर्ये, ह्या सभासदांच्या मनांत नवीन झालेलें "पार्वतीपरिणय" या नांवाचें नाटक पाहावें अशी इच्छा आहे.

**नटी**.—आर्या, तें नवीन नाटक कोणत्या कवीनें केलें ?

**सूत्र०**.—तुला ठाऊक नाहीं काय ? तर सांगतों ऐक.—

आर्या.

**कविसार्वभौम[2] झाला वत्सकुलामाजि बाण या नांवें ।**
**यज्जिव्हाग्रीं विधिवाक्[3] खेळे कविनीं जयास वानावें[4] ॥ ४ ॥**

त्या बाणकवीनें हें नवीन नाटक रचिलें आहे, त्यांत कथानक फार सुंदर बांधिलें आहे. त्या नाटकाचा प्रयोग करून सभासदांस आनंद द्यावा असें मी इच्छितों.

---

१ शिवपार्वती. २ कविश्रेष्ठ. ३ ब्रह्मदेवाची वाणी. ४ वर्णावें.

**नटी** । अज्ज अण्णएसु नाडएसु वट्टदेसु कहं तहिंजेव्व तत्त
होदो अहिलासो । ( १ )

श्लोकः ।

**सूत्र०** । **संविधानस्य सामग्र्यं रसानां परिपुष्टता ।**
**संदर्भसौकुमार्यं च सभ्यानां रंजने क्षमम् ॥ ५ ॥**

तत एवाहं गुणग्राहितया तत्र प्रवृत्तः ।

**नटी** । जइ एव्वं जुज्जई । ( २ )

**सूत्र०** । नटीं निर्वर्ण्य । आर्ये पार्वतीपरिणयप्रसंगेपि किं
निमित्तं भवती विमनायमानेव विलोक्यते ।

**नटी** । अज्ज इमिणा परिणअप्पसंगेन अह्माणंवि वच्छाए बाल-
चंडिआए अणुरूववरलाहमहुस्सवो कहं भविस्सदित्ति णि-
रंदरं चिंदाउळं होइ मे हिअअम् । ( ३ )

**सूत्र०** । अलं विषादेन ।

---

१ आर्यान्येषु नाटकेषु वसत्सु कथं तत्रैव तत्रभवतोभिलाषः ।
२ यद्येवं युज्यते ।
३ आर्यानेन परिणयप्रसंगेनास्माकमपि वत्साया बालचंडिकायां अनुरूप-
वरलाभमहोत्सवः कथं भविष्यतीति निरंतरं चिंताकुलं भवति मे हृदयम् ।

**नटी.**—आर्या, याखेरीज दुसरीं नाटकें पुष्कळ आहेत. तीं सारीं सोडून याच नाटकावर तुमची प्रीति कां बरें ?

**सूत्र०.**—प्रीति कां तें तुला सांगूं ? असें आहे—

श्लोक.

**पूर्णत्व संविधानाचें रसांचें परिपोषण ।**
**संदर्भाचें सौकुमार्य सभ्यांचें करि तोषण ॥ ५ ॥**

हे गुण या नाटकांत आहेत ह्मणून यावर प्रीति.

**नटी.**—जर असें आहे तर ठीकच आहे.

**सूत्र०.**—( नटीकडे निरखून पाहून ) आर्ये, याकाळीं पार्वती-परिणयाचा प्रसंग असतां तूं अगदीं खिन्न झाल्यासारखी दिसतेस याचें कारण काय ?

**नटी.**—आर्या, ह्या परिणयप्रसंगानें आपली मुलगी जी बालचंडिका तिला अनुरूप वरलाभ कसा होईल ह्या चिंतेनें माझें मन निरंतर व्याकुळ असून आज फार खिन्न झालें आहे.

**सूत्र०.**—ह्या गोष्टीची तूं चिंता करूं नको. कां कीं,—

आर्या ।

विधिरेव कन्यकानामभिमतवरयोजनार्थमुद्युंक्ते ।
अयमिह महतीदयितो मुनिरिव गिरिराजकन्यायाः ॥६॥

इति प्रस्तावना ।

ततः प्रविशत्याकाशमार्गेण नारदः ।

**नारदः** । हंत जन्मनः प्रभृति न जहाति नूनमस्मानियममरकार्यघटनाकुतूहलिता । यतः ।

श्लोकः ।

दक्षाल्लब्धसमुद्भवा तदनु तं त्यक्त्वा पतिं द्रोहिणं
जाता संप्रति शैलराजसदने गौरीति दाक्षायणी ।
एनां योजयितुं हरेण हिमवत्सानौ तपस्तन्वता
कार्यं भावि समाकलय्य मरुतामद्य प्रवर्तामहे ॥ ७ ॥

किंचिदंतरमवतीर्य आलोक्य च । परिवहनाम्नः पवनस्य पंथानं प्राप्तवानस्मि । तथा हि ।

श्लोकः ।

आरादंजलिपेयमत्र विकसन्मन्दारपुष्पोत्थितं
सौरभ्यं पवनोपनीतमभितो धावंत्यमी षट्पदाः ।

आर्या.

**विधिच असे कन्येला अभिमत वर योजनार्थ उद्योगी ।**
**गिरिराजकन्यकेला हा जैसा नारदाख्य मुनि योगी ॥ ६ ॥**

ही प्रस्तावना, ह्मणजे उत्तरपात्रप्रवेशसूचना होय.

( इतक्यांत आकाशमार्गानें नारद मुनि येतो. )

**नारद.**—काय करावें ? जन्मापासून देवांची कार्यघटना करण्याविषयींचा ह्व्यास जो मनास लागला आहे तो सुटत नाहीं. पाहा—

श्लोक.

**दक्षापासुनि जन्मुनी त्यजि पिता कीं तो पतीचा[1] अरी**
**झाली संप्रति शैलराजतनया गौरी नवाख्या[2] धरी ।**
**योजाया तिस शंभुशीं हिमनगीं जो[3] सत्तपस्या करी**
**साधाया सुरकार्य आज अमुची बुद्धि प्रवर्ते खरी ॥ ७॥**

(कांहींसा खालीं उतरून आणि अवलोकून) परिवह-नामक वायूच्या मार्गाप्रत मी प्राप्त झालों.

श्लोक.

**पुष्पांचाच सुवास कल्पतरूच्या हा सूटला भोंवती**
**ने, वायू जिकडे तयास तिकडे भुंगे पहा धांवती ।**

---

१ शिवाचा शत्रु. २ दाक्षायणी नांव सोडून गौरी हें नाम धरी. ३ शंभु.

तंत्रीमंडलमार्द्रयंति कणिका मंदाकिनीपाथसा-
मप्यंतःकरणं च मे सुमहतीमालंबते निर्वृतिम् ॥ ८ ॥

सरभसावतरणं नाटयित्वा । अधोवलोक्य । अये मध्यमलोकस्य नेदीयांसं प्रदेशमनुप्रापितोस्मि । यतः ।

श्लोकः ।

उद्यद्भिः शिखरैरमी कतिचन व्यज्यंत एवाचला
वैमल्यादनुमीयते च सरितां स्रोतस्विनी संततिः ।
सूच्यंते परिमंडलेन तरवो नीलांबुदश्रीमुषो
मंदमंदमुपैति लोचनपथग्राह्यां दशां मेदिनी ॥ ९ ॥

पुनर्विलोक्य साश्चर्यम् ।

आर्या ।

गिरिवरतटिनीगुल्मैर्दर्शनपदवीं क्रमादुपारूढैः ।
अवरोहति मयि रभसाद्भूरियमारोहतीव गगनतलम् ॥ १० ॥

मुहूर्तमात्रादवतीर्णोस्मि हिमवदुपकंठभूमिं । किंचिदंतरमवतीर्य परिक्रम्यावलोक्य च । अयं हि शैलराजः ।

---

* नैर्मल्यादिति पाठांतरम् ।

गंगेच्या जलबिंदुनीं भिजविली वीणा मदीया अहा !
माझें चित्त तथापि येथ रमलें पावोनि सौख्या महा ॥८॥

(वेगानें खालीं उतरल्यासारखें दाखवून, आणि अधोभागाकडे पाहून) अहो, मध्यम लोकाच्या समिपप्रदेशाप्रत मी प्राप्त झालों. कशावरून तर—

श्लोक.

झालीं उंच म्हणोनि हीं सुचविती शैलांसि त्यांचीं शिरें[1]
नैर्मल्यास्तव वाहतां गमति हीं स्रोतस्विनीचीं निरें[2] ।
जागोजाग घनासमान तरूंची दाटी दिसों लागली
माझ्या दृष्टिस येतयेत अवघी पृथ्वी क्रमें पावली ॥ ९ ॥

(पुन्हा अवलोकन करून आश्चर्य पावून)

आर्या.

पर्वत सरिता[3] पादप[4] माझ्या हे स्पष्ट दृष्टिला पडती ।
मी उतरत असतांही वाटे गगनांत भूमि[5] हे चढती ॥ १० ॥

अहो, मी एका मुहूर्तामध्यें हिमालय पर्वताच्या समीप आलों. (कांहींसा खालीं उतरून इकडे तिकडे फिरून पुढें पाहून) हाच शैलराज हिमालय.

---

१ शैलांचीं इ० पर्वतांचीं शिखरें. २ नद्यांचीं उदकें. ३ नद्या. ४ वृक्ष. ५ पृथ्वी.

श्लोकः ।

उत्सारयन्निव विभाति नभोवकाशं
शृंगैर्विहारभवनैरिव तुंगतायाः ।
आभोगवद्भिरमृतांशुकरावदातै-
राक्रामतीव कटकैर्हरिदंतराणि ॥ ११ ॥

अतिरिच्यते खल्वयमसाधारणेन भुवनधुरंधरेण भूम्ना मंदरगंधमादनप्रभृतिभ्यो महामहीधरेभ्यः । यतः ।

श्लोकः ।

त्रिभुवनगुरुणा गुणातिरागा-
त्कमलभुवाकलिताधिपत्यलक्ष्मीः ।
अविरतमनुशास्ति देवतात्मा
सकलमिदं कुलशैलचक्रवालम् ॥ १२ ॥

तदहमधुना किंनरीगीतनिष्पंदकृष्णसारेण चमरीजालवालविक्षेपविरचितालीकचंद्रोदयविलासेन कस्तूरीपरिमलापहितगगनागमनखेदेन शैलेयगंधिना कटकवर्त्मना प्रस्तुतवस्तुसाधनाय प्रविशामि यावदोषधिप्रस्थम् । तथा कृत्वा पुरोवलोक्येदं तदोषधिप्रस्थम् ।

श्लोक.

याचीं विशाल शिखरें अति उंच गेलीं
वर्त्में[1] नभांतिल तिहीं[2] अवरुद्ध[3] केलीं ।
चोहींकडे पसरले पृथुपाद[4] याचे
हे व्यापितात अवकाश जणों दिशांचे ॥ ११ ॥

याचा असाधारण भुवनधुरंधर महिमा आहे. तेणेंकरून हा मंदर गंधमादनप्रभृति पर्वतांपेक्षां अतिश्रेष्ठ आहे. कारण कीं—

श्लोक.

हा सर्वदेवमय देखुनि या गुणातें
शैलाधिपत्य दिधलें विधिनें तयातें ।
माथां धरोनि विधिच्या गुरुशासनातें[5]
हा शासितो सकलही कुलपर्वतांतें ॥ १२ ॥

हा मार्ग फार रमणीय दिसत आहे. या मार्गांत किन्नरीचें गान ऐकत कृष्णसार मृग स्तब्ध उभे राहिले आहेत. तिकडे चमरी[6] आपलीं शुभ्र पुच्छें वर उभारून फिरत आहेत. यामुळें चंद्रोदय होऊन चोंहीकडे चांदणें पडलें आहे असा भास होत आहे. कस्तूरीमृगांच्या संचारानें कस्तूरीचा परिमळ सुटला आहे, तेणेंकरून गगनागमनखेद[7] दूर

---

१ मार्ग. २ त्या शिखरांनीं. ३ अडविलीं. ४ फांटे. ५ श्रेष्ठ आज्ञेतें. ६ वनगाई. ७ आकाशांतून येण्याचा श्रम.

श्लोकः ।

विपुलकनकशृंगोपांतविश्रांतमेघं
सुरतरुवरवाटीशोभमानोपकंठम् ।
मणिभवनमहोभिः सृज्यमानेंद्रचापं
मदयति मम चेतो मंदिरं विस्मयानाम् ॥ १३ ॥

पुरप्रवेशमभिनीय । अग्रतो दृष्टिं दत्त्वा । इदमभ्रंलिहगोपुरशिखरावलीढनक्षत्रपथं हैमवतमायतनम् । प्रवेशं नाटयन् । आकाशे । भोः कंचुकिन्कुत्र वर्तते कुलाचलचक्रवर्ती । किं ब्रवीषि । देव्या मेनया सार्धं किमपि मंत्रयन्नभ्यंतर-

होत आहे. जागजागीं पाषाणांपासून रसस्राव होत आहे. त्यामुळें हा मार्ग सुगंधित झाला आहे. तर ह्याच कटकमार्गानें आपलें सांप्रतचें कार्य साधण्याकारितां ओषधिप्रस्थ नगरांत प्रवेश करावा. (तसें करून पुढें पाहून ह्मणतो.) हेंच ओषधिप्रस्थ नगर—

दिंड्या.

रत्नशिखरें अत्युच्च दीसताती।
जयावरती विश्रांति मेघ घेती॥
कल्पवृक्षांचे ताटवे सभोंवती।
स्थळें येथिल अत्यंत शोभताती॥
रत्नभवनांच्या प्रभा फांकताती।
इंद्रचापाची भ्रांति जना देती॥
विस्मयाचें मंदीर मना आलें।
चित्त माझें पाहूनि सुखी जालें॥ २ ॥ १३ ॥

(पुरप्रवेश केल्यासारखें करून अग्रभागीं दृष्टि देऊन) हेंच हिमालयाचें मंदिर. याच्या गोपुराचें शिखर नक्षत्रमंडलापर्यंत उंच गेलें आहे असें दिसतें. (मंदिरांत प्रवेश केलासें दाखवून आकाशाकडे पाहून) अरे कंचुक्या, कुलाचलचक्रवर्ती कोठें आहे? (उत्तर ऐकिलेंसें करून)

---

१ डोंगरकठारीनें.

मंडपमधिवसतीति । तर्हि साधीयानवसरः कार्यनिवेदनस्य । इति परिक्रामति ।

ततः प्रविशति हिमवान्मेनापरिवृतः परिजनश्च ।

**हिम०** । देवि कन्यापितृत्वं खलु गृहमेधिनामधिकतरं दुःखमावहति । अस्मत्कुलालंकरणमियं च गौरी परिणययोग्यां दशां प्रतिपद्यते । तथा हि ।

श्लोकः ।

**आभोगशालिकुचकुड्मलमायताक्ष्या**
**वक्षोवकाशमभिवांछति संनिरोद्धुम् ।**
**अप्यस्ति नास्ति वचसां विषयेवलग्ने**
**तन्वी समुल्लसति काचन रोमरेषा ॥ १४ ॥**

**मेना** । जहा अज्जउत्तो आणवेदि तहा विवाहमंगळजोग्गा संवुत्ता । ( १ )

**हिम०** । देवि अन्यदपि श्रूयताम् ।

आर्या ।

**कुचयुगलं परिणद्धं यथा यथा वृद्धिमेति तन्वंग्याः ।**
**वरचिंताहृतमनसस्तथा तथा कार्श्यमेति मे गात्रम् ॥ १५ ॥**

---

१ यथार्यपुत्र आज्ञापयति तथा विवाहमंगलयोग्या संवृत्ता ।

काय ह्मणतोस ? मेनादेवीबरोबर कांहीं विचार करीत आंतील चौकांत बसले आहेत ह्मणून, आपलें कार्य कळविण्यास हा समय चांगला आहे. (असें ह्मणून इकडे तिकडे फिरतो.) (इतक्यांत मेनादेवीसहवर्तमान सेवक मंडळीस घेऊन हिमवान् पर्वत येतो.)

**हिम०.**—हे देवी, कन्येचा बाप होणें हें गृहस्थास मोठें दुःखावह आहे. कां कीं पहा, आपली कन्या कुलभूषणा गौरी विवाहयोग्यस्थितीस प्राप्त झाली. पहा—

श्लोक.

**तन्वंगिचे स्तन हळूहळु वाढ घेती**
**वक्षावरील अवकाश भरूं पहाती ।**
**आहे नितंब पृथु बारिक मध्य[1] झाला**
**नाभीवरी दिसतसे तनु[2] रोम[3]माला ॥ १४ ॥**

**मेना.**—आपण बोलतां त्याप्रमाणें ही विवाहास योग्य झाली आहे खरी.

**हिम०.**—आणखी एक तुला सांगतों ऐक—

आर्या.

**कुचयुग्म कन्यकेचें जसें जसें वाढतें दिवसरात्र ।**
**वरचिंतेनें माझें तसें तसें क्षीण होतसे गात्र[4] ॥ १५ ॥**

---

१. कंबर. २ सूक्ष्म. ३ रोमराजि. ४ शरीर.

**मेना**। महवि रात्तिंदिअं भाइदे अस्सिंतज्जेव अद्धे णिहिअहि-अआए किं लक्खीअदि। (१)

**हिम०**। पुरोवलोक्य। देवि वीणाविहारी मुनिरित एवाभि-वर्तते तदर्घ्यमानीयताम्।

**मेना**। जहा आणवेदि अज्जउत्तो। (२) इत्यर्घ्यमानयति।

**हिम०**। उत्थाय सांजलिबंधम्। भगवन्नभिवादये।

**नार०**। अभ्युदयपरंपरावाप्तिरस्तु।

**हिम०**। आसनमुपनीयार्घ्यं समर्पयति।

**नार०**। प्रतिगृण्हाति।

**हिम०**। सहर्षमंजलिं बध्वा।

श्लोकः।

**स्वायत्तसिद्धाखिलकामनानां**
**तत्वे परस्मिन्परिनिष्ठितानाम्।**
**भवादृशामागमनोत्सवोयं**
**न लभ्यते नूनमनाप्तपुण्यैः॥ १६॥**

**नार०**। निस्पृहैरपि मादृशैस्त्वादृशाः सर्वाश्रमोपकारिणो गृह-मेधिनः पुरुषा द्रष्टव्या एव।

---

१ ममापि रात्रिंदिवं भावितेस्मिन्नेवार्थे निहितहृदयायाः किं लक्ष्यते।
२ यथाज्ञापयत्यार्यपुत्रः।

**मेना.**–मला हीच चिंता रात्रंदिवस असल्यामुळें माझीही तशीच अवस्था झाली आहे.

**हिम०**–( पुढें पाहून ) हे देवी, वीणाविहारी नारदमुनि इकडेसच येत आहे, तर अर्घ्यपाद्य लवकर घेऊन ये.

**मेना.**–आज्ञा महाराज. ( असें ह्मणून अर्घ्यपाद्य घेऊन येते. )

**हिम०.**–( उभा राहून हात जोडून ) हे भगवन् मुने, मी आपणास वंदन करितों.

**नारद.**–उत्तरोत्तर तुझा अभ्युदय असो.

**हिम०.**–(बसावयास आसन देऊन अर्घ्यपाद्य समर्पण करितो.)

**नारद.**–( अर्घ्यपाद्याचा स्वीकार करितो. )

**हिम०.**–( हर्षानें करसंपुट करून ह्मणतो– )

श्लोक.

**स्वाधीन ज्यांच्या सकळाहि सिद्धी**
**ज्यांची परब्रह्मिंच सक्त बुद्धी ।**
**अशा तुह्मां दर्शन सज्जनांचें**
**तें अल्पपुण्यास न व्हावयाचें ॥ १६ ॥**

**नारद.**–आह्मांसारख्या निस्पृहांनीं देखील सर्व आश्रमांवर उपकार करणाऱ्या तुह्मांसारख्या गृहस्थांची भेट घ्यावी हें योग्य आहे.

**हिम०** । यदभिहितं भवता तदनुग्राह्येषु ।

**नार०** । किमनुग्राहकस्यानुग्राह्यता । भावितर्कः । किं च तीर्थरूपो भवानस्माभिरभिगंतव्य एव । यतः ।

श्लोकः ।

शिरसि निपतिता पुरा पुरारे-
रथशिखरे तव यत्ततोवतीर्णा ।
अमरसरिदशेषलोकमान्या
त्रिभुवनपावनतामुपैति तेन ॥ १७ ॥

**हिम०** । किमेवमतिभूमिमारोप्यते निदेशवर्ती परिजनः ।

आर्या ।

**नार०** । अप्रतिमरूपलक्ष्ये गंगा गौरी च कन्यके भवतः ।

**हिम०** । एवमेतत् ।

**हिम०.**—आपण जें बोललां तें जे अनुग्रहास पात्र असतील त्यांविषयीं योग्य आहे.

**नार०.**—अरे, जो अनुग्रहकर्ता त्यास अनुग्रहपात्रता ती काय असावयाची आहे? तूं असा वितर्क करूं नको. आणखी असें आहे कीं, तूं तीर्थरूप आहेस ह्मणून तुझें दर्शन आह्मांसारख्यांनीं अवश्य घेतलें पाहिजे.

श्लोक.

**प्रथम पडिलि जी शिवोत्तमांगीं[1]**
**मग उतरे तुझिया शिरोविभागीं[2]।**
**द्युनदि[3] तरिच[4] लोकमान्य झाली**
**त्रिभुवनपावनता तिला[5] मिळाली ॥ १७ ॥**

**हिम०.**—महाराज, मी आपला आज्ञाधारक सेवक आहें. मला एवढ्या योग्यतेवर कशास चढवितां?

**नार०.**—असो, तुला कांहीं विचारावयाचें आहे.

आर्या.

**अप्रतिम[6]रूपलक्षण गंगा गौरी तुझ्या सुता दोघी।**

**हिम०.**—होय, आहेत खऱ्या.

**नार०.**—(उत्तरार्द्ध ह्मणतो.)

---

१ शिवमस्तकीं. २ शिखरावर. ३ भागीरथी. ४ असें झालें ह्मणूनच. ५ भागीरथीला. ६ निरुपम.

**नार०** । पूर्वा तयोः पुरस्तादनुरूपं रमणमंबुधिं प्राप्ता ॥१८॥

**हिम०** । अस्त्येतत् ।

**नार०** । द्वितीयायास्तु ते दुहितुः को नाम वरोभिप्रेतस्तत्र भवता ।

**हिम०** । भगवन्निममेवार्थं विचिंतयतो मे मनसि महानुपतापः ।

श्लोकः ।

**नार०** । न नागलोके न मनुष्यलोके
न देवलोकेपि समो वरोस्याः ।
एषां प्रभुर्यस्तनयां त्वदीयां
स एव देवः परिणेतुमीष्टे ॥ १९ ॥

**हिम०** । तमपि भगवानेव निवेदितुं प्रगल्भ्यते ।

**नार०** । आत्मगतम् । अस्येदानीं सामान्यवचनैरेव चंद्रचूडामणिर्निगूहितव्यः । प्रकाशम् । मया किल प्रणिधानचक्षुषा दृष्टोयमर्थः । यथा विश्वाधिकं कमपि वरमियं ते दुहिता प्रपत्स्यते । न पुनरिमामिति विशेषेण ।

पहिलीस पति मिळाला अनुरूप प्रथम अंबुधि[1] महौघी[2] ॥१८॥

**हिम.**०–असें आहे खरें.

**नार**०.–आतां तुझ्या दुसऱ्या कन्येस अनुरूप वर त्वां कोणता योजिला आहे ?

**हिम**०.–हे भगवन्, याच गोष्टीच्या चिंतेनें मी दुःखी आहें.

**नार**०.–तुझ्या कन्येला योग्य वर ह्मणशील तर–

श्लोक.

**न नागलोकीं[3] न मनुष्यलोकीं[4]**
**हिला पती योग्य न देवलोकीं[5] ।**
**लोकत्रयाचा[6] प्रभु त्याच देवें**
**तुझ्या सुतेलागिं वरें वरावें ॥ १९ ॥**

**हिम**०.–असा वर कोणता तो सांगावयास आपणच समर्थ आहां.

**नार**०.–(आपल्या मनांत ह्म०) या समयीं ह्याला चंद्रचूडच वर असें न सांगतां मोघम सांगावें. (मग स्पष्टपणें बोलतो) अंतर्ध्यानानें मला एवढें समजतें कीं, विश्वाधिक असा कोणी वर तुझ्या सुतेला मिळावा. अमुकच असें सांगवत नाहीं.

---

१ समुद्र. २ मोठा ओघ ज्याचा असा. ३ पाताळीं ४ पृथ्वीवर. ५ स्वर्गामध्यें. ६ स्वर्ग, भूमि, पाताळ या तीन लोकांचा जो प्रभु त्यानें.

**हिम०** । विश्वाधिक इत्येतावता कृतार्थोऽस्मि ।

श्लोकः ।

**नार०** । पुण्येन केनापि किलावतीर्णा
पुरातनी शक्तिरियं सुता ते ।
इमामसाधारणरूपलक्ष्मीं
न लोकसामान्यसुतां प्रतीयाः ॥ २० ॥

ततश्च भवता दुहितेयं न यस्मै कस्मैचित्प्रदित्सितव्या।

**हिम०** । नाहं भवदाज्ञां लंघयामि ।

**नार०** । अभ्युदयस्य निमित्तमन्यदपि किंचिदुपदिश्यते । यथा ।

श्लोकः ।

अष्टाभिरेवतनुभिर्भुवनं दधान-
स्तेजस्त्रयेण महता विहितेक्षणश्रीः ।
अन्येषु सत्स्वपि य ईश्वरशब्दवाच्यः
सोऽयं तपस्यति तटे तव चंद्रमौलिः ॥ २१ ॥

**हिम०** । अस्त्येतत् ।

**नार०** । ततो भवानंतिकमागतमिंदुशेखरं सपर्यया कयाचि-
दुपतिष्ठताम् ।

**हिम०.**—विश्वाधिक ह्मणतां इतक्यानेंच मी कृतार्थ झालों.

**नार०.**—ही तुझी कन्या सामान्य नव्हे—

श्लोक.

**भाग्यें तुझ्या ही अवतीर्ण झाली**
**पुरातनी[1] शक्ति गृहास आली ।**
**लक्ष्मीपरी रूपवती ह्मणावी**
**न लोकसामान्यसुता गणावी ॥ २० ॥**

या साठीं ही कन्या त्वां भलत्या एखाद्या वराला देऊं नये.

**हिम०.**—मी आपली आज्ञा उल्लंघित करणार नाहीं.

**नार०.**—अभ्युदयाचें दुसरें एक कारण सांगतों—

श्लोक.

**घेऊनि आठ तनु[2] जो धरितो[3] जगाला**
**सूर्याग्निचंद्र असती नयनें जयाला ।**
**आहे यथार्थ[4] जगिं ईश्वर नांव ज्याला**
**तो शंभु या तव तटीं करितो तपाला ॥ २१ ॥**

**हिम०.**—हें खरें आहे.

**नार०.**—या साठीं समीप असणारा जो इंदुशेखर त्याचें कोणत्या तरी पूजादिउपायानें आराधन कर.

---

१ आदिशक्ति. २ आठ मूर्ति. ३ सांभाळितो. ४ खरें.

**हिम०** । भगवन्नभिधेहि का वा सपर्या ।

**नार०** । अनुरूपसखीजनपरिवृतां दुहितरमिमां गौरीं समित्कुशदूर्वाद्युपहरंतीं परिचर चंद्रशेखरमिति प्रेषयतु भवान् ।

**हिम०** । तथा करिष्यामि ।

**नार०** । आत्मगतम् । उपक्षिप्तं बीजम् । कर्तव्यं च सामान्यवृत्त्या निवेदितम् । तद्यथागतं गमिष्यामि । प्रकाशम् । हिमवन्यदुक्तमस्माभिस्तदनुष्ठीयताम् । इत्याकाशमार्गेण निष्क्रांतः ।

**हिम०** । विलोक्य ।

श्लोकः ।

**दिवापि देहप्रभया दर्शयन्दिक्षु चंद्रिकाम् ।**
**द्वितीय इव चंद्रोयमारोहति दिवं मुनिः ॥ १२ ॥**

मेनां प्रति । देवि श्रुतं खलु त्वया महामुनेर्वचनम् ।

**मेना** । सुदं मए विस्साहिओ पुरिसो णाहो त्ति । (१)

**हिम०** । स्वगतम् । विश्वाधिकशब्दोपक्षेपेण कर्तव्योपदेशेन

१ श्रुतं मया विश्वाधिकः पुरुषो नाथ इति ।

**हिम०.**—महाराज, पुजादिउपाय कोणता कसा तो आपणच स्पष्ट सांगावा.

**नार०.**—अनुरूप सखीजनाला बरोबर घेऊन तुझी कन्या गौरी समित्कुशदूर्वादि आणावयास नित्य जात असते. तिलाच चंद्रशेखराची सेवा नित्य करीत जा असें सांगून त्याजकडे पाठीव.

**हिम०.**—बरें आहे. असें मी करीन.

**नार०.**—( मनांत ह्म० ) बीजारोपण तर झालेंच. आणि जें कर्त्तव्य तें सामान्य रीतीनें याला सांगितलें. (उघडपणें) हे हिमवंता, मी सांगितल्याप्रमाणें करीत जा. आतां मी जातों. (असें बोलून आकाशमार्गानें निघून जातो.)

**हिम०.**—( तिकडे पाहून ह्मणतो. )

श्लोक.

**देहप्रभेनें धवळी दिवसाही दिशा दहा।**
**चंद्र हा दुसरा जाणों आकाशीं चढला पहा ॥ २२ ॥**

( मेनेला ह्मणतो ) हे देवि, महामुनीचें वचन त्वां ऐकिलेंना ?

**मेना०.**—ऐकिलें मी, विश्वाधिक पुरुष वर होईल हें.

**हिम०.**—( मनांत ह्मणतो ) विश्वाधिक पुरुष असें ह्मणण्यानें

च दुहितुरस्याश्चंद्रशखेर एव वर इति सूचितम् । प्रकाशम् । देवि नारदोपादिष्टामिंदुमौलिसपर्यां विरचयितुं दुहितरं नियोक्तुमनुजामहे । इति निष्क्रांताः सर्वे ।

॥ इति पार्वतीपरिणये नाटके प्रथमोंकः ॥

---

## अंकः २.

ततः प्रविशति वनदेवता वासंतिका ।

**वासं०** । आणत्तंम्हि णंदीस्सरेण जहा वासंदिए णिअमट्ठिदस्स णीळलोहिदस्स पूवापुप्फाइं णंदणवणादो आणेहित्ति । ता जहा आदिट्ठं णंदीस्सरेण तहा आआसमग्गेण गदुअ सोरहवासिददिसामुहाइं कप्पदुमकुसुमाइं णंदणवणादो अवचेदुं गमिस्सं । (१) तथा करोति ।

ततः प्रविशति रंभा ।

---

१ आज्ञप्तास्मि नंदीश्वरेण यथा वासंतिके नियमस्थितस्य नीललोहितस्य पूजापुष्पाणि नंदनवनादानयेति । तद्यथादिष्टं नंदीश्वरेण तथाकाशमार्गेण गत्वा सौरभ्यवासितादिशामुखानि कल्पद्रुमकुसुमानि नंदनवनादवचेतुं गमिष्यामि ।

आणि कर्तव्यतेच्या उपदेशानें चंद्रशेखरच वर असावा असें सुचविलें. (उघडपणें) हे देवि, चंद्रशेखराची पूजा करावी ह्मणून, नारदमुनीनें सुचविलें आहे. तर त्या कार्याविषयीं आपण कन्येची योजना करावी, उपेक्षा करूं नये. (असें ह्मणून सर्व निघून जातात.)

**पहिला अंक समाप्त.**

---

## अंक २.

(तदनंतर वासंतिकानामक वनदेवता येते.)

**वासं०.**—नंदीश्वरानें मला आज्ञा केली आहे कीं, अगे वासंतिके, नियमस्थित जो नीललोहित त्याची पूजा करण्याकरितां नंदनवनापासून पुष्पें घेऊन ये. तर नंदीश्वराच्या आज्ञेप्रमाणें आकाशमार्गानें नंदनवनांत जाऊन दिशामुखांस सुवासित करणारीं कल्पवृक्षांचीं फुलें आणावयास मी जातें, (तसें करितें). (इतक्यांत रंभा येते.)

**रंभा** । तारआसुरबंदिग्गहणसज्झसपरिसंकिदो अच्छरोजणो महामेरुगुहाणिळीणो आसि । अहं उण कुबेरणंदणं णळकूवरं खणं विहाय जीविदं धारेदुं ण पारेमि । तदो तं एव्व अहिसरामि । (१) इत्यवतरति ।

**वासं०** । रंभां दृष्ट्वा । अए प्पिअसही रंभा समाअच्छई । ता उपसप्पामिणं । (२) तथा करोति ।

**रंभा** । अए हिमवक्कडअणिवासिणी वणदेवदा वासंदिआ । भद्दं प्पिअसहीए । (३)

**वासं०** । प्पिअसही किं एत्थ आअदे । (४)

**रंभा** । तारआसुरबंदिग्गहसज्झससंकिदो अच्छरोजणो महामेरुगुहाणिळीणो वट्टई । (५)

**वासं०** । सच्चं सो तारिसो दुट्ठसीळो । (६)

---

१ तारकासुरबंदिग्रहणसाध्वसपरिशंकितोप्सरोजनो महामेरुगुहानिलीन आसीत् । अहं पुनः कुबेरनंदनं नलकूबरं क्षणं विहाय जीवितं धारयितुं न पारयामि । ततस्तमेवाभिसरामि ।

२ अये प्रियसखि रंभा समागच्छति । तदुपसर्पाम्येनाम् ।

३ अये हिमवत्कटकनिवासिनी वनदेवता वासंतिका । भद्रं प्रियसख्याः ।

४ प्रियसखि किमत्रमागतम् ।

५ तारकासुरबंदिग्रहणसाध्वसशंकितोप्सरोजनो महामेरुगुहानिलीनो वर्तते ।

६ सत्यं स तादृशो दुष्टशीलः ।

**रंभा.**–सर्व अप्सरा तर, तारकासुर आपणांस धरून नेईल या भयानें शंकित होत्सात्या महामेरूच्या गुहेमध्यें लपून राहिल्या आहेत. मला तर कुबेरनंदन जो नलकूबर त्याला सोडून क्षणभरही राहवत नाहीं. याकरितां मी त्याजकडेसच जातें. (असें बोलून खालीं उतरते.)

**वासं०.**–(रंभेला पाहून) अगाई! ही रंभा. ही इकडेसच येत आहे. अगोदर तिची भेट घेऊं या. (तसें करिते.)

**रंभा.**–अहो ही हिमवत्पर्वतीं राहणारी वासंतिका वनदेवता! अगे प्रियसखि वासंतिके, तुझें कल्याण असो.

**वासं०.**–प्रियसखि रंभे, तूं इकडे कोणीकडे?

**रंभा.**–तारकासुराच्या भयानें सर्व अप्सरा मेरुपर्वताच्या गुहेंत लपून राहिल्या आहेत.

**वासं०.**–खरेंच तो मेला असाच दुष्ट स्वभावाचा आहे.

**रंभा** । कुबेरणंदणं खणं अदिट्ठिअ णसक्कुणोमि जीविदं धारेदुं त्ति पिअसही सुट्ठुदरं जाणादि । (१)

**वासं०** । पढमं जाणामि पसिद्धो क्खु तुम्हाणं अण्णोण्णाणुराओ । (२)

**रंभा** । तदो अहं आसण्णा अट्ठ मअणकोअंडणिरंदरणिस्सरच्छरणिअरजज्जरिदहिअआअहिसरामि वंचिअ सहीजणाणं-णळकूबरं । (३)

**वासं०** । जुज्जइ तारिसस्स अणुराअस्स ईरिसो व्वावारो ।(४)

**रंभा** । तुमं उण कहिं गच्छासि । (५)

**वासं०** । णिव्वाणंदणिजस्सरूवस्स लोअणमेत्तवाडवस्स भअव-

---

१ कुबेरनंदनं क्षणमदृष्ट्वा न शक्नोमि जीवितं धारयितुमिति प्रियसखी सुष्ठुतरं जानाति ।

२ प्रथमं जानामि प्रसिद्धः खलु युवयोरन्योन्यानुरागः ।

३ ततोहमासन्नात्र मदनकोदंडनिरंतरानिःसरच्छरनिकरजर्जरितहृदयाभिसरामि वंचयित्वा सखीजनान्नलकूबरम् ।

४ युज्यते तादृशस्यानुरागस्येदृशो व्यापारः ।

५ त्वं पुनः कुत्र गच्छसि ।

रंभा.–मी तर कुबेरपुत्र जो नलकूबर त्याला सोडून क्षणभर-ही राहावयास समर्थ नाहीं हें तूं जाणतच आहेस.

वासं०.–हें मला पहिल्यापासून ठाऊक आहे. तुह्मां उभयतांचा एकमेकावर जडलेला अनुराग प्रसिद्धच आहे.

रंभा.–ह्मणूनच मी मदनबाणांनीं व्याकुळ होत्साती सखी-जनासीं प्रतारणा करून त्या नलकूबराकडे चालल्यें आहें.

वासं०.–ठीकच. तशा अनुरागाला असा व्यापार यो-ग्यच आहे.

रंभा.–पण तूं कोणीकडे चाललीस?

वासं०.–नित्यानंदस्वरूप त्रिलोचन भगवान् शंकर याच्या पूजेकरितां नंदनवनांत जाऊन पुष्पें आणावीं अशी

दस्स णीळलोहिदस्स पूआपुप्फाइं णंदणवणादो आणेदुं आणत्तम्हि णंदीस्सरेण । ( १ )

रंभा । पिअसही अह्वि अहिणवो तह्व वुत्तंतो । ( २ )

वासं० । अण्णो कोवि णह्वि । पिदुणो णिदेसेण सवरिजणा पव्वई दिअसे दिअसे आगदुअ महादेवं आराधेइ । ( ३ )

रंभा । किं आराधणस्स फळम् । ( ४ )

वासं० । परमेस्सरप्पसादो । ( ५ )

रंभा० । जुज्जई । गच्छ तुमं पद्धुदं कज्जं कादुं । अहंवि जहा संकप्पिदं कादुं गमिस्सं । ( ६ ) इति निष्क्राते ।

---

१ नित्यानंदनिजस्वरूपस्य लोचनमित्रवाडवस्य भगवतो नीललोहितस्य पूजापुष्पाणि नंदनवनादानेतुमाज्ञप्तास्मि नंदीश्वरेण ।

२ प्रियसखि अस्त्यभिनवस्तत्र वृत्तांतः ।

३ अन्यः कोपि नास्ति । पितुर्निदेशेन सपरिजना पार्वती दिवसे दिवसे आगत्य महादेवमाराधयति ।

४ किमाराधनस्य फलम् ।

५ परमेश्वरप्रसादः ।

६ युज्यते । गच्छ त्वं प्रस्तुतं कार्यं कर्तुम् । अहमपि यथासंकल्पितं कर्तुं गमिष्यामि ।

नंदीश्वराची मला आज्ञा झाली आहे, याकरितां मी नंदनवनास जातें.

**रंभा.**—कायगे प्रियसखि, तेथें कांहीं नवीन वृत्तांत झाला आहे काय ?

**वासं०.**—दुसरा कांहीं नाहीं. इतकेंच कीं, पित्याच्या आज्ञेवरून परिजनासहवर्त्तमान पार्वती रोजरोज येऊन महादेवाची आराधना करीत असते.

**रंभा.**—या आराधनेचें फळ काय बरें ?

**वासं०.**—परमेश्वराचा प्रसाद.

**रंभा.**—योग्यच आहे. बरें, तर तूं जा आपल्या आरंभलेल्या कार्यास. मीही आपला मनःसंकल्प सिद्ध करावयास जातें. (असें बोलून दोघी निघून जातात.)

विष्कंभकः । ततः प्रविशति विविक्तस्थानमधिवसन्महेंद्रः ।

**महें०** । मंडपद्वारं विलोक्य । कः कोत्र भोः । प्रविश्य देवनंदी ।

**देवनं०** । स्वामिन्नयमस्मि ।

**महें०** । महत्कार्यं विचारणीयमस्त्यतो बृहस्पतिमंतरेण नान्यः प्रवेशनीयः ।

**देवनं०** । तथेति निष्क्रांतः । ततः प्रविशति बृहस्पतिः ।

**बृह०** । पुरोवलोक्य अयमिह महेंद्रो विविक्तस्थानमंडपे वर्त्तते । एष खलु ।

श्लोकः ।

**कैश्चिन्नेत्रैर्दलितदनुजं वज्रमालोकमानः**
**कैश्चित्पश्यन्नमरसुदृशां सस्मितान्याननानि ।**
**कैश्चित्सेवाविहितमनसा मंजलिं वीक्षमाण-**
**श्चित्ते चिंतापर इव पुरो दर्शनो वासवो मे ॥ १ ॥**

तदेनमुपसरामि । तथा करोति ।

**महें०** । बृहस्पतिं दृष्ट्वा । इहोपविश्यताम् ।

**बृह०** । तथेति भद्रासनांतिकमुपविशति । प्रविश्य देवनंदी ।

(हा विष्कंभक ह्मणजे उत्तरकथेची सूचना.)

(तदनंतर महेंद्र येतो आणि एकांतस्थानीं बसतो.)

**महें०.**—(मंडपद्वाराकडे पाहून) कोण आहेरे तेथें ?

**देवनंदी.**—(प्रवेश करून) स्वामिराज, हा मी आहें.

**महें०.**—अरे, कांहीं मोठ्या कार्याचा विचार कर्तव्य आहे याजकरितां, बृहस्पतीवांचून दुसऱ्या कोणास आंत येऊं देऊं नको.

**देवनं०.**—आज्ञा महाराज, (असें बोलून बाहेर जातो.)

(इतक्यांत देवगुरु बृहस्पति येतो.)

**बृह०.**—(पुढें पाहून) हाच महेंद्र एकांतस्थानीं मंडपांत बसला आहे. हा असा दिसतो—

ओंव्या.

**कांहीं नेत्रें वज्राकडे । कांहीं सुरांगनांच्या मुखाकडे ।**
**कांहीं सेवकमंडळीकडे । लावोनियां बघताहे ॥ १ ॥**
**ऐसा सिंहासनीं पुरंदर । बसला असे रणधुरंधर ।**
**परंतु चित्तीं चिंतातुर । या समयीं दिसताहे ॥ २ ॥ १ ॥**

तर आतां त्याच्या जवळ जातों. (तसें करतो.)

**महें०.**—(बृहस्पतीला पाहून) गुरो, यावें, येथें बसावें.

**बृह०.**—बरें आहे. (असें ह्मणून सिंहासनाजवळ बसतो.)

**देवनं०** । स्वामिन् देवदूतो देवलो विज्ञापयति । विज्ञाप्यं मे किंचिदस्तीति ।

**महें०** । तमेकं प्रवेशय । ततः प्रविशति देवदूतः ।

**देवदूतः** । अयं हि स्वामी बृहस्पतिना किमपि मंत्रयन्वर्तते । तदेनमुपसर्पामीत्युपसृत्य । जयतु जयतु स्वामी ।

**महें०** । देवल किमुद्विग्न इव विलोक्यसे ।
**देवदू०** । अतिभूमिं गमितामसुरपीडां कथं स्वामिने विज्ञापयामि ।

**महें०** । मा भैषीः कथय तेषामुद्यमम् ।

**देवदू०** । कथयामि श्रूयताम् ।

श्लोकः ।

**उद्धृत्यामरदीर्घिकाजलभुवामंभोरुहाणां ततिं**
**स्वैरं नंदनपादपानभिमतानामूलमुन्मूल्य नः ।**
**हृत्वा वांछितवस्तुदानचतुरां तामर्जुनीं दुर्जनाः**
इत्यर्धोक्ते विरमति ।

देवनं०.–(प्रवेश करून ह्मणतो.) महाराज, देवांचा देवलनामा दूत आला आहे. तो कांहीं विज्ञप्ति करावयास इच्छीत आहे.

महें०.–तर त्या एकट्याला येऊं दे. (तदनंतर देवदूत आंत येतो.)

दे०दू०.–हा स्वामी महेंद्र बृहस्पतीबरोबर कांहीं मंत्र करीत बसला आहे. त्याजकडे मी जातों. (असें बोलून जवळ जाऊन) स्वामीचा जयजयकार असो.

महें०.–अरे देवला, तूं असा उद्विग्न कां दिसतोस?

दे०दू०.–महाराज, देवांस पराकाष्ठेची असुरपीडा प्राप्त झाली आहे. ती मी स्वामीस कशी कळवूं?

महें०.–भिऊं नको. सांग, सांग दुष्टांनीं काय चालविलें आहे तें.

दे०दू०.–सांगतों, ऐकावें महाराज,–

श्लोक.

देवांच्या सरिते[1]मधील कमळें काढोनियां टाकिलीं
मंदारादिक कल्प[2]पादपमुळें खाणोनियां काढिलीं।
वल्ली वांछित[3]वस्तुदानचतुरा नेऊनि ती अर्जुनी[4]
(असें अर्द्धें बोलून उगा राहतो.)

---

१ गंगेतील. २ कल्पवृक्ष. ३ इच्छितफल देणारी. ४ वल्लीचें नांव.

**महें०** । अवशिष्टं च कथ्यताम् ।

**दे०दू०** । चतुर्थः पादः ।

**स्वर्गस्त्रैणकचग्रहं रचयितुं निःशंकमुद्युंजते ॥ २ ॥**

**महें०** । देवल कुलिशसहाये मद्बाहौ जाग्रति किमेवमतिशंका क्रियते । पश्य ।

श्लोकः ।

**वृत्रं बलं च नमुचिं च कथावशेषं**
**कृत्वा विधाय किल पर्वतपक्षभेदम् ।**
**त्रैलोक्यरक्षणपटोर्मम तारकेस्मि-**
**न्वधोवरः किमु महानयमंतरायः ॥ ३ ॥**

तत्कतिपयैरेव दिवसैस्तत्प्रतिक्रिया भविष्यति । गच्छ त्वं समुचितनियोगकरणाय ।

**दे०दू०** । तथेति निष्क्रांतः ।

**महें०** । गुरो किमतःपरं विधातव्यम् ।

**बृह०** । यदादिष्टं भगवता विरिंचेन । यथा पूर्वेद्युरेव तारकदनुजाक्रांतिमसहमानैरस्माभिरमरपरिषदा सार्धं भगवानुपस्थितः पद्मयोनिराचष्ट । यथा सेनान्यमंतरेण नान्येन तारको निहंतव्यः । तदुत्पादने चायमभ्युपायः ।

**महें०.**—उगा कां राहिलास ? पुरतें सांग काय तें.

**दे०दू०.**—( चतुर्थचरण ह्मणतो )

**दिव्यस्त्रीकचसंग्रहोद्यम अतां आरंभिला दुर्जनीं ॥ २ ॥**

**महें०.**—देवला, वज्रधारणकर्ता माझा बाहु जागरूक असतां तुह्मी इतके भितां कशासाठीं? पहा—

श्लोक.

**वृत्रासुरादि बहु ज्यां अरि मर्दियेले**
**वज्रेंचि पक्ष गिरिंचे बहु छेदियेले ।**
**त्या तारकास वरदान विधातयाचें**
**झालें तथापि मजला भय काय त्याचें ॥ ३ ॥**

असो, थोड्या दिवसांनीं त्या गोष्टीचा बंदोबस्त होईल. भिऊं नको. आतां जा तूं आपल्या योग्य कामास.

**दे०दू०.**—बरें आहे महाराज. (असें ह्मणून निघून जातो.)

**महें०.**—गुरुमहाराज, आतां पुढें कोणता उपाय करावा ?

**बृह०.**—जो ब्रह्मदेवानें सांगितला आहे तोच. तारकासुराचा उपद्रव आह्मांस सोसवेना ह्मणून आह्मी सर्व देव, ऋषि मिळून ब्रह्मदेवाकडे कालच गेलों होतों. त्याची प्रार्थना केली, तेव्हां त्यानें सांगितलें कीं, कुमारसेनान्यावांचून त्या तारकासुराचा वध दुसऱ्याकडून व्हावयाचा नाहीं. तर त्याच्या उत्पादनाचा उपाय हा आहे.

आर्या ।

हैमवते कटकतटे शशांकचूडामणिस्तपस्तनुते ।
यत्नेन येन केनचिदस्तु प्रणयी स पार्वत्याम् ॥ ४ ॥

ततस्तयोरात्मसंभवेन सेनान्या कुमारेण वो मनोरथसिद्धिर्भविष्यतीति ।

महें० । तत्कथं गिरिजा गिरिशेन परिग्राह्यते । कदा वा तदुत्पन्नः कुमारः पूरयिष्यति नो मनोरथम् ।

बृह० । नहीश्वराणां व्याहृतयो व्यभिचरंति ।

महें० । सस्मरणं सहर्षं च । विरिंच्यसमादिष्टमसमत्कार्यमभ्यंगीकुर्वतीव पितुर्निदेशेन सपरिजना पार्वती दिवसे दिवसे समागत्य भगवंतमिंदुशेखरं परिचरतीति रंभामुखादश्रौषम् ।

बृह० । यद्येवं सिद्धं नः समीहितम् ।

महें० । किमेतावता ।

आर्या.

**हिमवद्गिरिशिखरावरि, बैसुनि जो भालचंद्र तप करितो।**
**कोण्या तरी प्रयत्नें, प्रीति करो शीघ्र पार्वतीवरि तो॥ ४॥**

तर त्या शिवपार्वतीपासून उत्पन्न होणारा जो कुमारसेनानी त्याच्या योगानें तुमची मनोरथसिद्धि होईल असें ब्रह्मदेव बोलला.

**महें०.**—तर मग गिरिजेचा स्वीकार शंभु करणार कधीं, त्यांपासून कुमार होणार कधीं, आणि तो आमचा मनोरथ सिद्धीस नेणार कधीं?

**बृह०.**— लवकरच होईल. काळजी करूं नका. थोरांचें वचन अन्यथा व्हावयाचें नाहीं.

**महें०.**— (स्मरण झालेंसें करून हर्षानें) हो हो, खरेंच, आह्मी रंभेच्या मुखापासून ऐकिलें आहे कीं, परिजनासह वर्तमान पार्वती पित्याच्या आज्ञेनें प्रतिदिवशीं येऊन भगवान् इंदुशेखर याची परिचर्या करीत असते. यावरून नारदानें सांगितलेल्या आमच्या कार्याचा तिनें अंगिकार केला आहे असें वाटतें.

**बृह०.**— असें जर आहे तर आपलें कार्य सिद्ध झालें असें समजावें.

**महें०.**—इतक्यानें काय होणार आहे? तो शिव आहे.

श्लोकः ।

मुग्धैरप्सरसां विलाससहितैर्वाक्यैर्मनोहारिभिः
कर्णांतस्खलितैरपांगवलितैरंचितभ्रूलतैः ।
बाहोः स्रस्तकुचोत्तरीयघटनामंजुक्वणत्कंकणै-
र्व्यापारैरपि यो विकारपदवीं न प्रापितः संयमी ॥ ५ ॥

तस्य पुनरचिंतनीयमधिकानंदसुंदरमनादिनिधनमनंजन-मगुणाक्रियमात्मानमबाह्येन चक्षुषा साक्षात्कुर्वतः समुपसंहृताखिलद्वैतकलनाविकल्पस्य स्वतंत्रकर्त्तुश्चराचरगुरोर्भगवतश्चंद्रमौलेः कियद्वशीकरणं गौरीपरिचरणम् ।

बृह० । भगवन्ननन्ययुवतिसामान्यामेव तां न मन्येथाः । यतः ।

आर्या ।

आसेचनकतनुश्रीरंतःकरणस्य किमपि संवननम् ।
सा खलु गिरिराजसुता संमोहनमस्त्रमेव पुष्पेषोः ॥ ६ ॥

साक्या.

पूर्वीं देवांगना शिवातें वळवाया बहु झटल्या ।
मधुर हि हंसल्या जवळ हि बसल्या वाक्य मनोहर वदल्या ॥
अपांगदृष्टी करूनिहि त्यांनीं भ्रूवल्ली हालविल्या ।
कुचावरिलही पुनः पुन्हा त्या पदर सारितां थकल्या ॥
नृत्यगीत इत्यादिक त्यांनीं बहुविध विलास केला ।
परि तो योगी विकारपदवीप्रत नाहीं पावविला ॥ ३ ॥ ५ ॥

तो शिव सामान्य नव्हे. त्याची शक्ति अचिंतनीय आहे. जो सर्वदा स्वानंदांत रमणारा, ज्याला आदिअंत नाहीं, ज्याचेठायीं अज्ञानलेश राहत नाहीं, जो गुणक्रियारहित, जो ज्ञानदृष्टीनें आत्मसाक्षात्कार पावणारा, जो इंद्रियें स्वाधीन ठेवणारा, ज्याचा द्वैतभाव निरस्त झाला, जो स्वतंत्र कर्त्ता, जो चराचर गुरु, तो भगवान् चंद्रमौलि पार्वतीच्या परिचरणानें वशीकृत होईल काय ?

बृह०.—हे इंद्रा, पार्वती ह्मणजे इतर स्त्रियांसारखी सामान्य स्त्री आहे असें समजूं नको. कां कीं—

आर्या.

लावण्याची सीमा जें दृढ बंधनचि चित्तसदनाचें ।
तीही गिरिराजसुता संमोहन अस्त्र होय मदनाचें ॥ ६ ॥

महें० । सहर्षम् । पुष्पेषोरित्युपोद्घातेन स्मारितोस्मि स एव स-योर्गिरिजागिरिशयोर्घटने पटीयानिति ।

बृह० । सहर्षम् ।

आर्या ।

त्रैलोक्यशासने दक्षा तावकी मतिरूर्जिता ।
शांतिकं पौष्टिकं कर्तुं शक्ता नः केवलं मतिः ॥ ७ ॥

यतो मदीयापि बुद्धिरिमां वितर्कपदवीं नावतीर्णा । तदवि-लंबितमेव समाहूयतां कामः ।

महें० । मंडपद्वारं विलोक्य । कः कोत्र भोः । प्रविश्य देवनंदी ।

देवनंदी । स्वामिन्नयमस्मि ।

महें० । देवनदिन्नाहूयतां झटिति कामः ।

देवनं० । तथेति निष्क्रांतः । ततः प्रविशति रतिवसंताभ्यां कामः ।

कामः । उपसृत्य । सर्वेस्थास्याम इत्युपसर्पति ।

महें० । विलोक्य सहर्षम् ।

**महें०.**–( हर्षपावून ) मदनाचें अस्त्र ह्मटलें यावरून मला स्मरण झालें कीं, गिरिजागिरिश यांच्या घटनेविषयीं तो मदनच समर्थ आहे.

**बृह०.**–( हर्षपावून ) इंद्रा, तूं मोठा कल्पक आहेस–

आर्या.

**त्रैलोक्यशासनीं तव दक्षा मति ह्मणुनि कीर्तिला पात्र ।**
**माझी तों मति शक्ता शांतिक पौष्टिक करावया मात्र ॥ ७ ॥**

मी आपणास बुद्धिमान् ह्मणवितों, पण हा तर्क माझ्या बुद्धींत आला नाहीं. तर आतां लवकर कामास बोलावून आणीव.

**महें०.**– ( मंडपद्वाराकडे पाहून ) कोण आहे तिकडे ?

**देवनंदी.**– ( प्रवेश करून ) स्वामिमहाराज, हा मी आहें.

**महें०.**– अरे देवनंदी, जाऊन कामास लौकर बोलावून आण.

**दे०नं०**– आज्ञा महाराज. ( असें ह्मणून निघून जातो. )

( तदनंतर रति आणि वसंत यांसहवर्तमान काम येतो. )

**काम.**– ( पुढें पाहून ) चला आपण सारे इंद्राकडे जाऊं, (असें ह्मणून जवळ जातात.)

**महें०.**– ( पाहून हर्षानें)–

श्लोकः ।

मुखरमधुपमालाचारुमौर्वीसनाथं
त्रिभुवनजययोग्यं चापमंसे दधानः ।
मुखमुदितविलासं वीक्षमाणः प्रियायाः
सह मधुरिह मंदंमंदमायाति कामः ॥ ८ ॥

**कामः** । रतिवसंताभ्यां सार्धमुपसर्पति । चापगर्भेणांजलिना सविलासं प्रणमति ।

**महें०** । आसनांतिकं हस्तेन निर्दिशन्सखे काम इहोपविश्यताम् ।

**कामः** । रतिवसंताभ्यां सार्धमुपविशति ।

**बृह०** । अये माननीयं भवंतं स्थाने खलु मानयति महेंद्रः ।

**कामः** । अंजलिं बध्वा ।

श्लोकः ।

त्रैलोक्यनाथस्य तवातिशक्तेः
किमस्ति कार्यं मघवन्मयापि ।
प्रकाशिताशेषदिशावकाशो
दिवाकरो दीपमपेक्षते किम् ॥ ९ ॥

श्लोक.

मुखर[1] मधुपमाला[2] तीच मौर्वी[3] करोनी
जयनिपुण[4] फुलांचें चाप हातीं धरोनी ।
बघतबघत रम्य स्वप्रियेच्या[5] मुखाला
हळु हळु मधुसंगी[6] काम हा येथ आला ॥ ८ ॥

**काम.**–( रति आणि वसंत यांसहवर्त्तमान जवळ येतो आणि चापासुद्धां अंजलिबंध करून डौलानें इंद्रास प्रणाम करितो. ) देवेंद्राचा जय असो.

**महें०.**–( आपल्या आसनाचा समीपभाग हातानें दाखवून ) सखे कामा, येथें बसावें.

**काम.**–( रतिवसंतांसहवर्त्तमान खालीं बसतो. )

**बृह०.**–अरे कामा, तूं मान देण्यायोग्य आहेस ह्मणून तुला महेंद्र मान देतो हें योग्य आहे.

**काम.**–( हात जोडून विनयानें ह्मणतो– )

दिंड्या.

त्रिभुवनाचा तूं नाथ देवराया ।
कार्य मजकरवीं इच्छिसी कराया ॥
स्वप्रकाशें जो भरी दिशा दाही ।
गरज दीपाची भानुला तशा ही ॥ ९ ॥

---

१ शब्दायमान. २ भृंगपंक्ति. ३ धनुर्गुण. ४ जयशाली असें चाप. ५ रतीच्या. ६ वसंतसहित.

**बृह०** । मा भवानेवमाचष्ट ।

श्लोकः ।

असावलोकसामान्यचापविद्याधुरंधरः ।
करोतु कार्यं सकलं बाहुस्तव दिवौकसाम् ॥ १० ॥

**महें०** । सखे काम ।

श्लोकः ।

चक्रेण विष्णोरपि यद्दुरापं
तरस्विना वा शतकोटिना मे ।
तत्साधयेत्पुष्पमयं त्वदस्त्र-
महो भवानद्भुतबाहुवीर्यः ॥ ११ ॥

**कामः** । सगर्वम् । स्वामिन्यस्ते सापत्नमाचरति ।

गीतिः ।

दनुजो वा मनुजो वा मुनिरपि वा मुग्धचंद्रचूडो वा ।
सुरलोकसुंदरीणां स भवतु बद्धः कटाक्षशृंखलया ॥ १२ ॥

**महें०** । बृहस्पतेर्मुखमवलोकयति ।

**बृह०** । अये काम यस्त्वया चरमोर्थः परिगणितश्चंद्रचूडोवेति स इदानीं शंकरः शैलराजकटकसीम्नि निरतिशयशीतलांतःकरणस्तपश्चरति ।

**बृह०.**—बाबारे, असें ह्मणूं नको—

आर्या.

**तव भुज सामान्य नव्हे धनुष्यविद्याधुरंधरचि आहे ।**
**कार्य करी देवांचें हा अमुचा भार त्यावरचि राहे ॥ १० ॥**

**महें०.**—सखे कामा, काय सांगूं ?

श्लोक.

**न होय जें विष्णुसुदर्शनानें**
**किंवा न माझें दृढ वज्र यानें ।**
**तें साधितें [1]त्वत्सुमधन्व कार्य**
**आहे तुझें अद्भुत बाहुवीर्य ॥ ११ ॥**

**काम.**—( गर्वानें ) महाराज, जो कोणी तुमचें शत्रुत्व करतो तो पाहा, माझ्या सामर्थ्यानें—

आर्या.

**दनुज असो मनुज असो मुनिहि असो [2]मुग्ध चंद्रचूड[3] असो ।**
**तो गुंतुनि सुरसुंदरिकटाक्षजालांत बद्ध साच वसो ॥ १२ ॥**

**महें०.**—(बृहस्पतीच्या मुखाकडे पाहतो.)

**बृह०.**—अरे कामा, ज्याचें नांव तुवां शेवटीं घेतलें तोच चंद्रचूड शंकर हिमालयाच्या एका कड्यावर शांतांतःकरण होत्साता तपश्चर्या करीत आहे.

१ तुझें पुष्पमय धनुष्य. २ भोळा. ३ महादेव.

**कामः** । ततस्ततः ।

**बृह०** । तमिदानीं पितुर्निदेशेन सपरिजना पार्वती सौभाग्यमयीव सालभंजिका सौंदर्यदेवतेव विग्रहिणी परिचरति ।

**कामः** । ततस्ततः ।

**बृह०** । तयोश्च मेलने दिविषदां महती कार्यसिद्धिः । सा च भवंतमेवकटाक्षयति ।

**कामः** । आत्मगतम् । अनात्मता हि पुंसामात्मनिधनमापादयति । यदहमात्मप्रशंसापरवशः परमेश्वरमपि सामान्यवृत्त्या पर्यजीगणम् ।

**वसंतः** । आत्मगतम् । अन्यदुपक्रांतमन्यदेवापतितम् ।

श्लोकः ।

**क्वायं सुगंधिविशिखः स्वदमानचापः**
**स्त्रीणां वशीकरणकर्मणि जागरूकः ।**
**क्वासौ ललाटनयनानलविस्फुलिंग-**
**वार्त्तावशेषितपुरत्रितयो महेशः ॥ १३ ॥**

**काम.**—बरें मग?

**बृह०.**—सांप्रतकाळीं पित्याच्या आज्ञेनें परिजनासहवर्तमान पार्वती जणों सौभाग्याची पुतळी किंवा देह धारणकरणारी सौंदर्यदेवताच अशी होत्साती त्या शंकराचें परिचरण करीत असते.

**काम.**—बरें, मग पुढें बोला काय तें.

**बृह०.**—त्या दोघाचें मेलन झालें असतां त्यांत देवांची मोठी कार्यसिद्धि होणार आहे. ती कार्यसिद्धि तुजकडे पाहत आहे.

**काम.**—(मनांत ह्मणतो) अविचारीपणा पुरुषांस मरण देणारा आहे. पहा मी आत्मप्रशंसेला भुलून परमेश्वराचीही सामान्य वृत्तीनें गणना केली.

**वसंत.**—(मनांत ह्मणतो) आरंभिलें कार्य एक आणि उपस्थित झालें दुसरेंच. प्रसंग कठीण दिसतो—

श्लोक.

**कोठें प्रसूनशर ज्यास फुलें कमान**
**स्त्रीच्या वशीकरणकर्मिंच सावधान।**
**कोठें ललाट नयनांतिल अग्निलेश**
**प्रेषूनियां त्रिपुर जाळविता महेश ॥ १३ ॥**

रतिः । अह्नो अच्चाहिदं आपडिदं जं खंडपरसू जेदव्वो । (१)

कामः । यत्पुनः परिजनपरमाणोर्मत्तोपि मखभुजः कार्यमिच्छंति तदात्मव्ययेनापि कर्म कर्तुमुद्युंजे ।

गीतिः ।

महें० । संमोहनं तव शरे संहितमात्रे गिरींद्रकन्यायाः ।
मुखमतिमुदितविलासं विलोकयति मुग्धधृतिरीशः ॥१४॥

तदीषत्करेस्मिन्कार्ये भवता न किंचिदपि शंकनीयम् ।

श्लोकः ।

कामः । त्यजन्यास्यामि कार्याय प्राणान्प्रियतमानपि ।
यशः शरीरममलं लभंते ह्यनुषंगिणः ॥ १५ ॥

तद्यथादिष्टं स्वामिना तथा करिष्यामि । महेंद्रो बृहस्पतिश्च हस्तमुद्यम्य ।

१ अहो अत्याहितमापतितं यत्खंडपरशुर्जेतव्यः ।

**रति.**–अग आई, महादेवाला वश करणें हें मोठें संकट प्राप्त झालें कीं!

**काम.**–(धैर्य धरून) मी यःकश्चित सेवक असतां माझ्या हातून आपलें कार्य देव इच्छितात. त्यापक्षीं आत्मनाशें-करूनही त्यांचें कार्य मी करीन.

**महें०.**– हे कामदेवा, ऐकतोस–

आर्या.

**संमोहन बाण तुझा जरि शिवहृदयीं शिरोनि राहील।**
**धृति सोडुनि गौरीचें तो सुंदर मुख सुखेंचि पाहील॥१४॥**

तर हें काम अगदीं सोपें आहे, याविषयीं तूं मनांत कांहीं शंका धरूं नको.

**काम.**– सोपें असो वा कठिण असो.

आर्या.

**प्राण प्रियतम जरि ते टाकुनि जाईन देवकार्यास।**
**उद्योगी संपादिति यशाचि सुनिर्मळ करूनि आयास॥१५॥**

तर स्वामींनीं जशी आज्ञा केली तसेंच मी करीन.

**महें० बृह०.**– (वर हात उचलून) शाबास कामा.

श्लोकः ।

अस्तु स्वस्त्ययनं तवाद्य मरुतां सत्याशिषामाशिष-
स्त्वां रक्षंतु यशश्च तेस्तु विपुलं लोकत्रये दीप्यतु ।
शौर्यं त्वद्भुजयोरिदं च भवतात्पुंखानुपुंखोदयं
किंचोद्योगमिमं समर्थयतु नः स्वच्छंदचेष्टाविधिः ॥ १६

कामः । रतिवसंताभ्यां सह शंकमानो निष्क्रांतः ।

महे० । गुरो विरिंच्यादिशादनुरूपमस्माभिरेव तावदनुष्ठितम् कार्यसिद्धौ भगवती नियतिरेव प्रभवति ।

बृह० । अहमपि प्रस्तुतकार्यसिद्ध्ये कुलदेवताः प्रार्थयितुं गमिष्यामि । इति निष्क्रांताः सर्वे ।

इति पार्वतीपरिणये नाटके द्वितीयोंकः ॥ २ ॥

श्लोक.

तूतें स्वस्ति असो सदैव मुनिंच्या रक्षोत आशी[1] तुला
होवो कीर्ति तुझी उदंड पसरो लोकत्रयीं निस्तुला[2]।
शौर्यातें भुज हे तुझे करुत बा जे शक्तिवारांनिधी[3]
कार्यातें अमुच्या करो सफल तो स्वच्छंदचारी विधी[4] ॥१६॥

**काम**.– तथास्तु (असें ह्मणून रति आणि वसंत यांसहवर्तमान शंकित होत्साता निघून जातो.)

**महें०**.– हे गुरो, नारदाच्या उपदेशाप्रमाणें जें करावयाचें तें या वेळपर्यंत आपण केलें. आतां कार्यसिद्धि होणें दैवाच्या स्वाधीन आहे.

**बृह०**.– खरें आहे. मीही प्रस्तुतकार्याच्या सिद्धीकरितां कुलदेवतेची प्रार्थना करावयास गमन करितों. (असें ह्मणून सर्व निघून जातात.)

**द्वितीय अंक समाप्त.**

---

१ आशीर्वाद. २ निरुपम. ३ शक्तिसागर. ४ दैव.

## ॥ अंकः ३ ॥

ततः प्रविशति महेंद्रो बृहस्पतिश्च ।

**बृह०** । गुरो किं नाम कामः केनापि बाणसंधानेन खंडपरशुं वशीकुर्यात् । आहोस्वित् संवर्तसमयदिनकरदुष्प्रेक्ष्यं मुनिमीक्षितुमशक्नुवन्निवर्तेत । अथवा कोपांधकारिचेतसात्मानं भालनयनपावकस्य पुरोडाशतां नीयेत । कथं भविष्यतीति न जाने । वामाक्षिस्पंदनं सूचयित्वा । साशंकम् ।

श्लोकः ।

**अदक्षिणमिदं चक्षुः स्फुरितैः शंसतीव मे ।**
**देवकार्यविघाताय जाग्रतो वामतां विधेः ॥ १ ॥**

**बृह०** । प्रतिहतममंगलम् । भगवन्ननेन निमित्तेन ज्ञाप्यते वृत्तांतज्ञेन केनचिदागंतव्यमिति । ततः प्रविशति नारदः

## अंक ३.

(तदनंतर महेंद्र आणि बृहस्पति येतात.)

**महें०.**–हे गुरो, आपण शिवाकडे काम पाठविला आहे खरा, पण तो कोणत्या तरी प्रकारच्या बाणसंधानानें शिवाला वश करील, किंवा प्रलयकालच्या सूर्यासारखा दुःप्रेक्ष्य जो तापस शिव त्याजकडे पहावयास असमर्थ होऊन परत माघारां येईल, अथवा साहसानें शिवासमोर जाऊन शिवाच्या तृतीयनेत्रसंबंधी अग्नींत आहुति होईल. कसें काय होईल हें समजत नाहीं. (इतक्यांत डावा डोळा लवलासें दाखवून शंकित होत्साता ह्मणतो–)

आर्या.

**डावा डोळा लवतो सूचवितो कुटिलता मला कुधिची[१] ।**
**देवांच्या कार्याचा घात करायास जागत्या विधिची[२] ॥ १ ॥**

**बृह०.**–इडा पिडा टळो, अमंगळ पळो. भगवन् महेंद्रा, या चिन्हावरून मला असें वाटतें कीं, तिकडील वृत्तांत जाणणारा कोणी तरी या समयीं येथें यावा. इतक्यांत वीणावादन करीत नारद येतो.

---

१ दुर्बुद्धीची हें विधीचें विशेषण. २ दैवाची.

**नार०** । मघवदादेशेन स्थाण्वाश्रमं गत्वा तत्रत्यमुदंतं विज्ञाय समागतोस्मि । तदेनमुपसृत्य निवेदयिष्यामि तत्रत्यमखिल-मुदंतमिति परिक्रामति ।

**महें०** । अंजलिं बध्वा विलोक्य । अयमेव महतीवल्लभो मुनिरुपसर्पति । तदासनमुपनीयताम् ।

**बृह०** । आसनमुपनयति ।

**नार०** । उपविशति ।

**महें०** । अंजलिं बध्वा । भवन्कथय भद्रमभद्रं वा दिविषदामभिलषितम् ।

**नार०** । सर्वमादितः प्रभृति कथयामि श्रूयताम् ।

**महें०** । अवहितोस्मि ।

**नार०** । तथा देवकार्याय प्रस्थितं कंदर्पं तिरस्कारिण्या विद्यया तत्रत्यवृत्तांतजिज्ञासयाहं त्वन्निदेशादन्वचरम् ।

**महें०** । ततस्ततः ।

**नारद.**— महेंद्राच्या आज्ञेवरून मी स्थाण्वाश्रमास जाऊन तेथील सर्व वृत्तांत जाणून आलों आहें. तर आतां इंद्राकडे जाऊन तिकडचा सकल वृत्तांत त्याला सांगितला पाहिजे. ( असें ह्मणून पुढें जातो. )

**महें०.**— ( नारदास पाहून हात जोडून बृहस्पतीस ह्म०. ) हा पहा वीणावादन करीत नारद इकडे येत आहे. तर त्यासाठीं आसन आणावें.

**बृह०.**— ( आसन आणतो. ) मुने यावर बसावें.

**नार०.**— ( आसनावर बसतो. )

**महें०.**—( हात जोडून ) भगवन् मुने, तिकडील वृत्त सांगावें, शुभ कीं अशुभ तें. देवांचा मनोरथ सफल होतो कीं, नाहीं ?

**नार०.**—आरंभापासून सर्व वृत्तांत सागतों. चित्त देऊन श्रवण करा.

**महें०.**—माझें अवधान आहे. सांगावें काय तें.

**नार०.**—देवकार्याकरितां तिकडे कंदर्पास पाठविल्यानंतर तेथील वृत्तांत जाणण्याकरितां त्या कंदर्पाच्या मागून मी गुप्त रूपानें फिरत होतों.

**महें०.**—बरें, मग पुढें काय झालें ?

नार० । तत्र स्थाण्वाश्रमसमीपमासाद्य कामो वसंतमभि
तवान् ।

महे० । कथमिति ।

नार० । सखे त्वयास्मिन्हिमवदुपकंठकानने विजृंभितव्यमिति

महे० । स किं कृतवान् ।

श्लोकः ।

नार० । वाचालयन्नथ कुलानि वनप्रियाणां
अंकूरयन्मलयमारुतकंदलानि ।
सख्युः प्रसूनविशिखस्य भुजावलेपं
संवर्धयन्मधुरजृंभत काननेषु ॥ २ ॥

महे० । ततस्ततः ।

श्लोकः ।

नार० । इत्तं प्रियाभिर्बहुमानपूर्व
मासाद्य चूतासवमन्यपुष्टाः ।
आमोदिभिः पंचमरागभेदैः
प्राबोधयन्पंचशरावलेपम् ॥ ३ ॥

महे० । ततस्ततः ।

**नार०.**–तेथें स्थाण्वाश्रमासमीप गेल्यावर त्या कामानें वसंतास सांगितलें.

**महे०.**–काय सांगितलें ?

**नार०.**–सांगितलें कीं, सखे वसंता, ह्या हिमालय पर्वताच्या जवळील वनांत त्वां प्रादुर्भूत व्हावें.

**महे०.**–मग वसंतानें काय केलें ?

**नार०.**–काय केलें तें सांगतों ऐका–

श्लोक.

**गायास लावि मधुर स्वर कोकिलांतें**
**वाहावया हळुहळू मलयानिलातें ।**
**गर्वास वाढवि रतीपतिच्या मनांत**
**ऐसा मधु प्रकटला हिमवद्वनांत ॥ २ ॥**

**महे०.**–मग पुढें ?

**नार०.**–पुढें ऐका–

श्लोक.

**दिलें प्रियांनीं बहुमानपूर्व**
**पिऊनि चूतासव तें अपूर्व ।**
**काकोळ ते पंचमराग गाती**
**गर्व स्मराच्या मनिं वाढवीती ॥ ३ ॥**

**महे०.**–मग पुढें ?

गीतिः ।

नार० । आधूय चंदनतरूनुत्तमनद्यास्तरंगमालिंग्य ।
आदाय कमलसौरभमंकुरितोमलयशैलपवमानः ॥४॥

महें० । ततस्ततः ।

श्लोकः ।

नार० । आदाय चापमधिरोपितषट्पदज्यं
तस्मिन्हिमाचलमुपेयुषि पंचबाणे ।
वेलातिलंघि किमपि प्रणयातिरेकात्
द्वंद्वानि लौल्यमभजंत विमोहितानि ॥ ५ ॥

महें० । ततस्ततः ।

श्लोकः ।

नार० । चूताः कोरकिता विनापि सुदृशां हस्तांबुजामर्शना-
त्तत्पादांबुजताडनैरपि विना कंकेलयः पुष्पिताः ।
तत्संगीतकमंतरेण हसिता रम्याः प्रियालद्रुमा
मुक्त्वा तद्वदनासवं मुकुलिता गंधोत्तराः केसराः॥६॥

महें० । ततस्ततः ।

नार० । किं बहुना ।

आर्या.

नार०.—हलवुनि चंदनतरुतें आलिंगुनियां नदीतरंगांतें।
घेउनि कमलसुगंधा मलयानिल वाहवी निजांगांतें[1] ॥ ४ ॥

म्हें० मग पुढें?

श्लोक.

नार०.—घेऊनि चाप गुण लावुनि भृंगमाला[2]
जेव्हां हिमाचलतपोवनिं काम आला।
क्रीडावया उघड निर्भय कीं निघालीं
द्वंद्वें[3] वनांतिल विमोहित सर्व झालीं ॥ ५ ॥

म्हें०.—मग पुढें ?

साक्या.

नार०.—नारीहस्तस्पर्शावांचुनि आंब्यास तुरे आले।
पादाघातावांचुनि त्यांच्या[4] अशोक पुष्पित झाले ॥
स्त्रीच्या गीताविनाहि रम्य प्रियाल तरु टवटवले।
नारीवदनासव नसतांही बकुलवृक्षही फुलले ॥ ६ ॥
देखा शक्ति वसंताची। जैशी अद्भुत संतांची ॥ ध्रु० ॥

म्हें०.— मग पुढें ?

नार०.—फार काय सांगावें—

१ आपल्या शरीरालें. २ भृंगपंक्ति. ३ स्त्रीपुरुषयुग्में. ४ स्त्रियांच्या.

गीतिः ।

**तस्मिन्वने निवसतामनुतटमुल्लंघ्यधैर्यमर्यादाम् ।**
**अबलासु निम्नगानामासीदतिरागसिंधुरुद्वेलः ॥ ७ ॥**

**अर्हे०** । एवं सकलजनविकारकारिणि तस्मिन्प्रवृत्ते किं कृतवान्कामः ।

**नार०** । स कामो रत्या वसंतेन चान्वीयमानो महति देवदारुखंडमंडपे तरक्षुचर्मनिर्मितायामहिमशिलावेदिकायामासीनमंतर्मुखनिहितचित्तवृत्तिमभ्यंतरपवनानिरोधानिश्चलाननं नासाग्रनिहितपक्ष्माण्यक्षीणि धारयंतमपरमिव निस्तरंगमंबुधिंतमिंदुशेखरमपश्यत् ।

**अर्हे०** । ततस्ततः ।

**नार०** । ततो भगवानपि नीललोहितः प्रतीचावलोकनेन प्रत्यंचमात्मानमपरोक्षीकृत्य शिथिलितपर्यंकबंधः प्रणिधानाद्विरंसीत् ।

**अर्हे०** । ततस्ततः ।

आर्या.

*अबलारूप नद्यांच्या आली अनुरागसिंधुला भरती।
धैर्याची मर्यादा सोडुनि तो फार वाढला वरती ॥ ७ ॥

अहं०.— याप्रकारें सकलजनांस विकार करणारा जो वसंत तो प्रवृत्त झाला असतां कामानें काय केलें ?

नार०.— तदनंतर रति आणि वसंत यांस घेऊन काम पुढें गेल्यावर देवदारूंच्या वनांत एका लतामंडपाखालीं मोठ्या शिलातलावर व्याघ्रचर्मासनावर बसलेला, ज्याची चित्तवृत्ति अंतर्मुख झाली आहे, जो प्राणवायूचा निरोध करून निश्चल झालेला, जो दुसरा निस्तरंग सागरच, ज्याणें पापण्या न हालवितां नासाग्रीं दृष्टि ठेविली आहे असा एकाग्रमनानें ब्रह्माचें ध्यान करणारा इंदुशेखर त्यानें पुढें पाहिला.

अहं०.—मग काय झालें ?

नार०.—तदनंतर तो नीललोहित (शंभु) अंतर्दृष्टीनें व्यापक परमात्म्याचा साक्षात्कार अनुभवून आसनबंध शिथिल करून ध्यानापासून विराम पावला.

अहं०.—मग पुढें ?

---

* स्त्रिया ह्याच नद्या त्यांच्या मनांत जी पुरुषाविषयीं प्रीति तोच समुद्र त्याला भरती आली.

नार० । स कामस्तद्दर्शनेन करतलविधृतकार्मुकः कर्तव्यमपर-मजानन्क्षणमालिखित इव भयादतिष्ठत् ।

महे० । ततस्ततः ।

श्लोकः ।

नार० । अत्रांतरे हरमुपासितुमभ्ययासी-
द्वासंतिकप्रसवकल्पितमंडनश्रीः ।
शृंगारवीरतपसामधिदेवतेव
साकं सखीभिरवनीधरराजकन्या ॥ ८ ॥

महे० । ततस्ततः ।

नार० । ततः स कामो लब्धावलंब इव समाश्वस्य दृष्टिप्रतीपप्रविहारेण पाश्चात्यभागमाश्रित्य समयं प्रतीक्ष्य स्थितवान् ।

महे० । ततस्ततः ।

नार० । पार्वती च सुखोपविष्टमष्टमूर्तिमष्टांगस्पृष्टभूमिरवंदिष्ट ।

महे० । ततस्ततः ।

नार० । अनुरूपरमणमासादयेति तामाशिषावर्द्धयदर्धचंद्रमौलिः ।

नार०.—मग तो काम सदाशिवास पाहून हातांत धनुष्य-बाण असतांही पुढें काय करावें हें न जाणतां भयानें क्षणभर उगीच चित्रासारखा स्तब्ध राहिला.

महे०.—बरें, मग पुढें ?

श्लोक.

नार०.—आली अशांत गिरिजा[1] हरसेवनाला[2]
पुष्पें शिरीं धरुनि शोभवि आननाला[3] ।
मूर्तीच केवळ गमे पहिल्या रसाची[4]
घेऊनियां निजसखीपरिवार साची ॥ ८ ॥

महे.—मग पुढें ?

नार०.—मग त्या पार्वतीला पाहून कामास कांहींसें धैर्य येऊन तो गुप्तरूपें पार्वतीच्या पाठीमागें उभा राहून समयाची प्रतीक्षा करीत राहिला.

महे०.—मग पुढें ?

नार०.—मग पार्वतीही सुखासनावर बसलेला जो अष्टमूर्ति सदाशिव त्यास साष्टांग नमस्कार घालिती झाली.

महे०.—मग पुढें ?

नार०.—मग पार्वतीला चंद्रमौलीनें आशीर्वाद दिला कीं, तुला अनुरूप भर्ता मिळो.

---

१ पार्वती. २ शिवसेवेला. ३ निजमुखाला. ४ शृंगाररसाची.

महे० । ततस्ततः ।

नार० । ततः । क्षणे तस्मिन्नयमेवावसर इति स कामः कार्मुके समाधत्त संमोहनं बाणम् ।

महे० । ततस्ततः ।

श्लोकः ।

नार० । तदनु युगपदीशः पार्वतीवक्त्रपद्मे
स्मितविकसितगंडे प्राहिणोल्लोचनानि ।

महे० । ततस्ततः ।

नार० । पुलकिततनुरंतर्भावमावेदयंती
दरमुदितमुखेंदुः सा च सव्रीडमस्थात् ॥ ९ ॥

महे० । ततस्ततः

नार० । ततो भगवानंतःकरणविक्रियां तपोबलेन संयम्य तत्कारणाय विष्वग्विलोचनानि व्यापारितवान् ।

महे० । ततस्ततः ।

**महें०**.—मग पुढें ?

**नार०**.—मग तत्क्षणींच कामानें हा समय बरा आहे असं मनांत आणून, धनुष्याचे ठायीं संमोहन बाणाची योज-ना केली.

**महें०**.—मग पुढें ?

**नार०**.—मग असें झालें—

श्लोक.

मग शिवहि बघाया पार्वती स्वाननातें
स्मित करुनि समर्पी आपुल्या लोचनातें ।

**महें०**.—मग पुढें ?

**नार०**.—शिवानें पाहिल्यावर—

हळुच बघुनि त्यातें खालती मान घाली
पुलकिततनु गौरी लज्जिता फार झाली ॥ ९ ॥

**महें०**.—मग पुढें ?

**नार०**.—मग भगवान् शंकर अंतःकरणास झालेला विकार तपोबलानें आवरून त्या विकाराचें कारण पाहण्याकरि-तां तिन्ही नेत्र उघडून चोहोंकडे पाहूं लागला.

**महें०**.—मग पुढें ?

---

१ सुभाननातें, सुंदर मुखातें. २ शिवातें. ३ [illegible] शरी-र अशी.

**नार०** ।

श्लोकः ।

आरादपश्यदधिसंहितमोहनास्त्रं
कर्णावतंसपदकल्पितकार्मुकज्यम् ।
आकुंचितैकपदमंचितपूर्वकायं
लक्षीकृतात्मवपुषं मदनं महेशः ॥ १० ॥

**महें०** । सभयम् । अवशिष्टं च कथ्यताम् ।

**नार०** । तदनु प्रकुपितस्य शूलिनो भाललोचनादुज्जृंभज्ज्वालावलीजटालो ग्रासलालस इव कालानलो वन्हिः ।

**महें०** । सनिर्वेदम् । किमतः परं निवेद्यते ।

**नार०** । तेन पुरारेर्नयनानलेन मदनः पुरोडाशतां नीतः ।

**महें०** । मूर्छति ।

**नार०** । समाश्वासयति ।

**महें०** । आश्वस्य । हा भुवनरमणीय पुष्पबाण सकलजनानंदन पुरंदरस्यार्थे त्यक्तजीवितोसि ।

नार०.—तों इतक्यांत.

ओंव्या.

हातीं घेऊनि धनुष्यातें । योजून संमोहन बाणातें ।
बळें करोनि मौर्वीतें । कर्णापर्यंत ओढित ॥ १ ॥
वीरासनीं उभा राहून । आपणावरी लक्ष धरून ।
बाण सोडितो ऐसा मदन । जवळ महेशें पाहिला ॥ २ ॥ १० ॥

महे०.—(सभय होऊन) अवशिष्ट काय तें सांगावें.

नार०.—मदन दृष्टीस पडतांच शूली इतका प्रकुपित झाला कीं, कालानलाप्रमाणें जगद्भक्षण करण्यास समर्थ असा त्याच्या भालनयनापासून ज्वाला टाकीत अग्नि बाहेर निघाला.

महे०.—(दुःख पावून) आतां पुढें काय सांगावयाचें आहे !

नार०.—मग त्या पुरारीच्या नयनाग्नीनें तो मदन पुरोडाशाहुतीप्रमाणें क्षणांत भस्म करून टाकिला.

महे०.—(मूर्छित होतो.)

नार०.—(त्याला सावध करितो.)

महे०.—(सावध होऊन) हा भुवनरमणीया, हा पुष्पबाणा, हा सकलजनानंदकरा, कंदर्पा, मज पुरंदराकरितां तूं जीवितास मुकलास ना !

**बृह०** । भगवन्माविषीद । भवितव्यता हि बलवती तदास्ताम् ।

**महे०** । रतिः किं कृतवती ।
**नार०** । रतिरपि मोहं प्राप्ता ।
**महे०** किं कृतवान्वसंतः ।
**नार०** मोहं प्राप्तः सखा वसंतोपि ।
**महे०** । मूर्छितौ रतिवसंतौ किमनुतिष्ठताम् ।

**नार०** प्रथमाश्वस्तेन मधुना कथंचित्संज्ञां लंभिता रतिः । पुरतः परुषपवनविकीर्यमाणपांसुपटलं भसितमयं पुरुषाकृति पत्युरंगमालिंग्य ।

गीतिः ।

**गुरुतरशोकोपहता कुररीव प्रियवियोगमापन्ना ।**
**आक्रंददार्तनादं बाष्पस्नपितोन्नतस्तनी बाला ॥१५॥**

**महे०** । ततस्ततः ।
**नार०** । तदनु हा नाथेति बहु विलपंतीं रतिमाश्वासयदाकाशवाणी । यथा ।

**बृह०.**–हे मघवन्, तूं इतका खेद करूं नको; भवितव्यता बलवती आहे. असो.

**महें०.**–असें झाल्यावर रतीनें काय केलें ?

**नार०.**–रतीही मोहित होऊन मूर्च्छित पडली.

**महें०.**–बरें वसंतानें काय केलें ?

**नार०.**–कामाचा सखा वसंतही मोहित झाला.

**महें०.**–रति आणि वसंत दोघेंही मूर्छित झालीं, पण त्यांनीं पुढें काय केलें ?

**नार०.**–पहिल्यानें वसंत सावध झाला. त्यानें मोठ्या कष्टानें रतीला सावध केलें. मग त्या रतीनें, वाऱ्यानें ज्यांतील पांसुकण उडविले आहेत असें भस्मपुरुषाकृति पतीचें शरीर अग्रभागीं पाहिलें व आलिंगून–

आर्या.

**प्रियविरहें शोकार्ता कुररीशी तीहि फार आरडली ।**
**बाष्पस्नाता होउनि धरातळीं उन्नतस्तनी पडली ॥ ११ ॥**

**महें०.**–मग पुढें ?

**नार०.**–मग ती पुनः सावध होऊन हा नाथ! हा रमण ह्मणून फार विलाप करीत असतां आकाशवाणीनें तिचें आश्वासन केलें तें असें–

श्लोकः ।

मुंच शोकमिह कामवल्लभे
लंघ्यते जगति केन कल्पना ।
उद्भविष्यति पुनश्च ते पतिः
पार्वतीपरिणयेपि नाकिनः ॥ १२ ॥

इति ।

महें० । समाश्वस्य । सहर्षमिव ।

गीतिः ।

भग्नो मनोरथो मे पुनरंकुरितुं किलायमद्युंक्ते ।
दावाग्निलीढशेषस्तरुरिव धाराधरेण संसिक्तः ॥ १३ ॥

बृह० । मघवन्सत्यैव वैहायसी वाणी । सर्वथा कामः पुनरुद्भविष्यति ।

महें० । ततस्ततः ।

नार० । कथंचित्प्रत्याश्वस्ता रतिर्नीता सा समानदुःखेन मधुना निजं भवनम् ।

महें० । कामं कथावशेषं कृत्वा कालकंठः किमकरोत् ।

नार० । स्त्रीसंनिकर्षं परिजिहीर्षया सह भूतगणेन भूतपतिरंतर्धानमकरोत् ।

महें० । किं कृतवती पार्वती ।

श्लोक.

टाकिं शोक अयि कामभामिनी
लंघ्य नाहिं विधिकल्पना जनीं ।
हा उठेलचि पुन्हा तुझा पती
पार्वतीपरिणयांत निश्चिती ॥ १२ ॥

महें०.—( कांहीं समाधान पावून हर्षानें )

आर्या.

भग्न मनोरथ झाला परि येइल फिरुनि अंकुर तयाला ।
दावाग्निदग्धतरुला शिंपडतां जेंवि मेघ तोयाला ॥ १३ ॥

बृह०.—हे महेंद्रा, ही आकाशवाणी खरी आहे. निश्चयें-करून काम पुनः उत्पन्न होईल.

महें०.—बरें, मग नारदा, पुढें काय झालें ?

नार०.—मोठ्या कष्टानें सावध झालेली रति समानदुःखी जो वसंत त्यानें आपल्या गृहाप्रत नेली.

महें०.—बरें नारदा, कामाचें भस्म केल्यावर नीलकंठानें काय केलें ?

नार०.—मग स्त्रीचें सांनिध्य उपयोगाचें नाहीं असें मनांत आणून भूतगणांसहवर्तमान भूतपति अंतर्धान पावला.

महें०.—मग पार्वतीनें काय केलें ?

नार० ।

श्लोकः ।

आगत्य दोर्भ्यामादाय मूर्छामुकुलितेक्षणा ।
नीता नितांतवात्सल्याद्गौरी हिमवता गृहम् ॥ १४ ॥

महें० । भगवन्नारद श्रुतं श्रोतव्यं किमतः परं प्रतिपद्यसे ।

नार० । पुनरिमं वृत्तांतं सत्यलोकवर्तिने चतुर्मुखाय निवेदयितुं गमिष्यामीति निष्क्रांतः । ततः प्रविशति रंभा ।

रंभा । कुवेरभवणादो णिवट्टमाणाए ओसहिप्पत्थणअरे जो मए आकण्णिदो वुत्तंतो तं सामिणे विण्णवेमि । (१) इति परिक्रामति ।

महें० । विलोक्य ।

आर्या ।

संचारिणीव वल्ली विद्युल्लतिकेव चापलोन्मुक्ता ।
मोहनकलेव मूर्ता कास्विदियं कमलपत्राक्षी ॥ १५ ॥

निरूप्य । रंभाखल्वियम् ।

रंभा । उपसृत्य । जेदु जेदु भट्टा । (२)

१ कुवेरभवनान्निवर्तमानया ओषधिप्रस्थनगरे यो मया आकर्णितो वृत्तांतस्तं स्वामिने विज्ञापयामि । २ जयतु जयतु भर्ता ।

नार०.—पार्वती काय करते. पण,—

आर्या.

**बाहूनीं धरुनि उरीं मूर्छेनें व्याकुळाच जी केली।**
**ती गौरी हिमवंतें अति वात्सल्यें गृहाप्रती नेली॥ १४॥**

महें०.—भगवंता नारदा, ऐकावयाचें तें ऐकिलें. आणखी पुढें ऐकून काय? पुरे आतां.

नार०.—बरें तर, आतां मी हा वृत्तांत सत्यलोकास जाऊन ब्रह्मदेवाप्रत कळवितों. (असें ह्मणून निघून जातो.)
(तदनंतर रंभा येते.)

रंभा.—कुबेरभवनापासून माघारीं येत असतां मीं ओषधिप्रस्थ नगरांत जें वर्त्तमान ऐकिलें तें स्वामींस जाऊन कळवितें. (असें बोलून पुढें जाते.)

महें०.—(तिकडे पाहून.)

आर्या.

**फिरणारी सुरवल्ली विद्युल्लतिकाच निश्चला झाली।**
**मोहनकलाच साक्षात् कोण अशी कंजलोचना आली॥ १५॥**

(निरखून पाहून) अहो, ही खरीच रंभा.

रंभा.—(जवळ जाऊन) स्वामींचा जयजयकार असो.

महे० । रंभे कुत आगम्यते भवत्या ।

रंभा । कुवेरभवणादो । (१)

महे० । किमस्ति तत्रापूर्वो वृत्तांतः ।

रंभा । णीललोहिदस्स णिडळाग्गिकाळजाळेण कहावसेसिदो कामो त्ति सव्वो भणइ । अण्णच्च किं वि ओसहिप्पत्थणअ-रे । (२)

महे० । किं तदन्यत् ।

रंभा । मंमहदाहेण भग्गमणोरहा पव्वई परमेस्सरं जेव्व पइं अहिलसंदी कठिणेहिं तवच्चरणेहिं अत्तणो अहिलासं पुरिदुं इस्सदि त्ति । (३)

महे० । किमुक्तमस्मिन्नर्थे मातापितृभ्याम् ।

रंभा । मेणआ देवीए एव्वं भणिदं । (४)

महे० । किमिति ।

रंभा ।

१ कुबेरभवनात् ।

२ नीललोहितस्य निटिलाग्निकाळजालेन कथावशेषितः काम इति सर्वः भणति । अन्यच्च किमप्योषधिप्रस्थनगरे ।

३ मन्मथदाहेन भग्नमनोरथा पार्वती परमेश्वरमेव पतिमभिलषंती कठिनैस्तपश्चरणैरात्मनोभिलाषं पूरयितुमिच्छतीति ।

४ मेनया देव्या एवं भणितम् ।

महें०.—रंभे, तूं कोणीकडून आलीस?

रंभा.—कुबेरभवनापासून.

महें०.—तिकडे कांहीं अपूर्व वृत्तांत आहे काय?

रंभा.—नीललोहिताच्या तृतीयनेत्रांतील अग्नीच्या ज्वालांनीं कामदेव दग्ध केला असें सर्व बोलतात. ओषधिप्रस्थनगराकडील वर्त्तमान वेगळेंच कांहीं आहे.

महें०.—तें कोणतें बरें?

रंभा.—मन्मथदाहानें पार्वती भग्नमनोरथा होऊन तोच परमेश्वर आपला पति व्हावा अशी इच्छा मनांत धरून कठीण तपश्चर्येच्या योगानें आपला अभिलाष पूर्ण करावयास इच्छीत आहे.

महें०.—या गोष्टीविषयीं तिच्या मातेनें आणि पित्यानें काय ह्मटलें?

रंभा.—मेनादेवी असें बोलली.

महें०.—कसें बोलली?

रंभा.—ती पार्वतीला असें ह्मणाली—

गीतिः ।

परुसो तवोविसेसो तुह उण अंगं सिरीससुउमारं ।
विवसिदमेदं कढिणं पव्वइ ता दुक्करं त्ति पडिभाई ॥ १६ (१)

**महें०** । किमुक्तं हिमवता ।

**रंभा** । अत्थि अणुमदं तेण । (२)

**महें०** । रंभे साधीयांसमुदंतमानीतवती गच्छ त्वं समुचितनियोगकरणाय ।

**रंभा** । तहेति (३) निष्क्रांता ।

नेपथ्ये वैतालिकः

श्लोकः ।

आधूय प्रणयं विवस्वति गते देशांतरे पद्मिनी
सोढुं तस्य वियोगमक्षमतया म्लायत्सरोजानना ।
संध्यावल्कलिनी द्विरेफपरिषद्रुद्राक्षमालावती
तत्प्राप्तिस्पृहयेव संप्रति तपः सक्ता समालक्ष्यते ॥ १७ ॥

**महें०** । आकर्ण्य । वयमपि संध्यां वंदितुं साधयामः । इति निष्क्रांताः सर्वे ।

॥ इति पार्वतीपरिणये नाटके तृतीयोंकः ॥

---

१ परुषस्तपोविशेषस्तव पुनरंगं शिरीषसुकुमारम् ।
व्यवसितमेतत्कठिणं पार्वति तद्दुष्करमिति प्रतिभाति ॥ १६ ॥
२ अस्त्यनुमतं तेन । ३ तथेति ।

आर्या.

**तप** फार कठिण दिसतें अंग तुझें तों शिरीष[1]सुकुमार।
[2]व्यवसाय तुझा पार्वति दृढ परि दुष्करें[3] गमे मला फार॥१६॥

**महे०.**—हिमवान् काय ह्मणाला ?

**रंभा.**—हिमवानाला ती गोष्ट मानवली.

**महे०.**—रंभे, फार चांगलें वर्त्तमान त्वां सांगितलें. आतां जा तूं आपल्या योग्य कामाला.

**रंभा.**—बरें आहे. ( असें ह्मणून निघून जाते. )

( इतक्यांत पडद्यामागून स्तुतिपाठक बोलतो.)

श्लोक.

गेला टाकुनि सौहृदा प्रियगडी देशांतरातें रवी
सोसाया विरहास अक्षम मुखीं म्लानत्वही दाखवी ।
संध्या वल्कल नेसुनी अलिमिषें रुद्राक्षमाला धरी
तत्प्रा[illegible]स्तव वाटतें कमलिनी उग्रा तपातें करी ॥ १७ ॥

**महे०.**—( श्रवण करून ) हो, हो, वेळ झाली. आतां मीही संध्यावंदनकर्म करावयास जातों. (सर्व निघून जातात.)

**तृतीय अंक समाप्त.**

---

१ शिरसाच्या फुलासारखें कोमल. २ निश्चय. ३ दुर्घट.

## अंकः ४ ।

ततः प्रविशति गृहीतमुनिविग्रहो नंदी ।

**नंदी** । आज्ञप्तोस्मि भगवता नीललोहितेन । यथा । नंदिन् मन्मथदाहेन भग्नमनोरथा पार्वती मन्निबंधनेन भावेन महांतं नियममनुतिष्ठंती गौरीशिखरनाम्नि पितुः शिखरे तपश्चरति । तपश्चरंत्याश्च तस्याः व्यतीतो बहुतिथिः कालस्तद्भवान् तत्र गत्वा गृहीतमुनिवेषः कीदृशो वा तस्या नियमः कीदृशो वाभिलाषबंध इति तत्सख्योर्जयाविजययोर्मुखेन विदित्वा पुनरागच्छत्विति । तत्प्रभोर्नियोगमनुतिष्ठामीति परिक्रामन्विमृश्य । प्रकृतिकठिनानि खलु स्त्रीणां चेतांसि । तथाहि ।

श्लोकः ।

**एषा शिरीषसुकुमारशरीरयष्टि-**
**श्चांद्री कलेव नयनोत्सवमावहंती ।**

## अंक ४ था.

( तदनंतर मुनिवेषधारी नंदी येतो. )

नंदी.—भगवान् नीललोहित यानें मला अशी आज्ञा केली आहे कीं, हे नंदिन् मन्मथदाहानें पार्वती भग्नमनोरथ होत्साती मजवर दृढ भाव ठेवून कठीण नियम धारण करून आपल्या पित्याचें गौरीशिखर नामक जें शृंग त्यावर तपश्चर्या करीत आहे. तप करितां करितां तिचे फार दिवस लोटले. याकरितां तूं मुनिवेषधारी होऊन तेथें जाऊन तिचा नियम कसा चालला आहे आणि तिच्या मनांत दृढ अभिलाष कोणता आहे हें तिच्या सख्या जया आणि विजया यांच्या मुखानें जाणून पुनः इकडे ये ह्मणून, तर आतां प्रभूची आज्ञा संपादावयास मी तिकडे जातों. ( असें बोलून पुढें जातो आणि विचार करून ह्मणतो. )

स्त्रियांचीं अंतःकरणें स्वभावतः कठीण असतात पहा—

श्लोक.

हीची असे कुसुमकोमल देहयष्टी[1]
चांद्री[2] कला तशिच दे नयनास तुष्टी।

---

१ कृशतनु. २ द्वितीयेची चंद्रकळा.

संचेतुमिच्छति शिलाकठिनैः शरीरैः
संपादितान्यपि तपांसि तपोधनानाम् ॥ १ ॥
अपि च ।

श्लोकः ।

शेते या किल हंसतूलशयने निद्राति सा स्थंडिले
वस्ते या मृदुलं दुकूलमबला गृण्हाति सा वल्कलम् ।
या वा चंदनपंकलेपशिशिरे धारागृहे वर्तते
पंचानामुदितोष्मणां हुतभुजां सा मध्यमासेवते ॥ २ ॥

ततः प्रविशतः कुसुमावचयमाचरंत्यौ जयाविजये ।

जया । हला विजए तवच्चरणे किदमतीए गौरीए मणोरह-कप्पद्दुमो कदा फळं दंसइस्सदि । (१)

विजया । हळा जए तहा मम्महदाहपरुसहिअओ णिक्करुण-दाए पढमं णिदंसणहूदो परमेस्सरो जदा अदद्धहिअओ हुविस्सदि तदा फळं दंसइस्सादि । (२) इति पुष्पावचय-माचरतः ।

---

१ हला विजये तपश्चरणे कृतमत्या गौर्या मनोरथकल्पद्रुमः कदा फलं दर्शयिष्यति ।

२ हला जये तथा मन्मथदाहपरुषहृदयो निष्करुणतया प्रथमं निदर्शन-भूतः परमेश्वरो यदा अदग्धहृदयो भविष्यति तदा फलं दर्शयिष्यति.

साधावया झटतसे तसल्या तपा ही
जें साधितां कठिण फार तपोधनांहीं ॥ १ ॥

आणखी–

श्लोक.

जी गादीवर नीजती सतत ती भूमीवरी नीजते
जी पीतांबर नेसती प्रतिदिनीं ती वल्कलें नेसते ।
ग्रीष्मीं चंदनपंकलेपें[१]–शिशिरीं धारागृहीं[२] जी वसे
ती पंचाग्निकरोनि दीप्त[३] बहुधा तन्मध्यभागीं बसे ॥ २ ॥

(इतक्यांत पार्वतीच्या सख्या जया आणि विजया ह्या फुलें वेंचीत येतात.)

**जया.**–काय गे विजये, दृढ तपश्चर्या करणारी जी आपली सखी गौरी तिचा मनोरथकल्पद्रुम कधीं बरें फळ दाखवील ?

**विजया.**–अगे जये, मन्मथदाहानें ज्याचें हृदय क्षुब्ध झालें आहे, अतएव निष्करुण झालेला जो परमेश्वर तो जेव्हां शांतचित्त होईल तेव्हां फळ दाखवील असें मला वाटतें. (असें बोलून दोघी फुलें वेंचूं लागतात.)

---

१ गंधानें सारविल्यामुळें थंडगार. २ कारंजाच्या घरांत. ३ प्रज्वलित.

**नंदी** । इमे खलु तस्याः प्रियसख्यौ जयाविजये । यावदुप-सर्पामि । तथा करोति ।

**जया** । हळा मह पुप्फकरंडअं पूरिदं पुप्फेहिं । तुह उण कहं । (१)

**विजया** । पुष्पकरंडकं विलोक्य । मह उण अद्धं पुरिदं अव-सिस्सं पूरइस्सं । (२) इति पुष्पकरंडकं पुष्पैः पूरयति ।

**नंदी** । उपसृत्य । भद्रं भवतीभ्याम् ।

**ज० वि०** । भअवं वंदामो । (३)

**नंदी** । के युवां किं निमित्तं वा पुष्पावचयमाचरयथः ।

**उभे** । अह्मे हिमवदस्स कण्णाए गौरीए पिअसहीओ तवच्चर-णणिअमट्ठिदाए ताए देवपूआपुप्फाइं अवचिणुमो । (४)

**नंदी** । किं निमित्तं वा तपस्तस्याः ।

---

१ हला मम पुष्पकरंडकं पूरितं पुष्पैः । तव पुनः कथम् ।

२ मम पुनरर्धं पूरितं अवशिष्टं पूरयिष्यामि ।

३ भगवन्वंदावः ।

४ आवां हिमवतः कन्याया गौर्याः प्रियसख्यौ । तपश्चरणनियमस्थिता-यास्तस्या देवपूजापुष्पाण्यपचिनुवः ।

**नंदी.**–खचित ह्याच तिच्या प्रियसख्या जया आणि विजया. तर आतां आपण त्यांच्या जवळ जावें. ( असें ह्मणून त्यांच्या जवळ जातो. )

**जया.**–अगे माझी परडी फुलांनीं भरली. तुझी कशी काय ?

**विजया.**–( आपल्या परडीकडे पाहून ) माझी तर अर्धी मात्र भरली आहे. अर्धी राहिली आहे ती मी आतां भरून टाकीन. ( असें बोलून झरझर फुलें वेंचून परडी फुलांनीं भरते. )

**नंदी.**–( जवळ जाऊन ) तुह्मां दोघींचें कल्याण असो.

**ज०वि०**–हे भगवंता, आह्मीं तुला वंदन करितों.

**नंदी.**–कोण तुह्मी ? आणि हीं फुलें कशासाठीं वेंचितां ?

**दोघी.**–आह्मी हिमवंताची कन्या जी गौरी तिच्या प्रियसख्या आहों. तिनें व्रतनियम धरिला आहे. तिच्या देवपूजेकरितां आह्मी फुलें जमा करीत आहों.

**नंदी.**–कोणत्या निमित्तानें तिनें व्रतनियम धरिला आहे?

**जया ।** अणुरूवं वरं लहेअं त्ति । (१)

**नंदी ।** कोसावनुरूपो वरः ।

**जया ।** आर्या ।

**जं किळ भणंदि वेआ णिच्चजुवाणं पुराणपुलिसं च ।**
**जो किळ धारइ णिच्चं ईस्सरसद्दं च चंदलेहां च ॥ ३ ॥**

एसा णो प्पिअसही तं ज्जेव्व परमेस्सरं पइं अहिलसंदी महिंदप्पमुहं लोअवालं अवमाण्णिअ तवच्चरणं करेइ । (३) किं च । मंम्महदाहवइरादो पिदुणो घरं प्पाविसिअ वलअं उक्कंठिदा आसी । (४)

**नंदी ।** तत्कथमुच्यताम् ।

**जया ।** आर्या ।

**पांडुक्खामसरीरा झडिदि णमंतवअणसरासिरुहा ।**
**क्खीणा पव्वइणालिणी पसुपइणो विरहग्गहेण ॥ ४ ॥ (५)**

---

१ अनुरूपं वरं लभेयमिति ।

२ यं किल भणंति वेदा नित्ययुवानं पुराणपुरुषं च ।
यः किल धारयति नित्यमीश्वरशब्दं च चंद्रलेखां च ॥

३ एषा नौ प्रियसखी तमेव परमेश्वरं पतिमभिलषंती महेंद्रप्रमुखान् लोकपालानवमन्य तपश्चरणं करोति ।

४ मन्मथदाहवैरात्पितुर्गृहं प्रविश्य बलवदुत्कंठिता आसीत् ।

५ पांडुक्षामशरीरा झटिति नमद्वदनसरासिरुहा ।
क्षीणा पार्वतीनलिनी पशुपतेर्विरहग्रहेण ॥ ४ ॥

जया.—अनुरूप पति मिळावा ह्मणून.

नंदी.—तो अनुरूप पति कोणता?

जया.—तोच—

आर्या.

ज्यातें वेद ह्मणति हा नित्य युवा हा पुराणपुरुष भला।
जो नित्य धरी देहीं ईश्वर हें नाम आणि चंद्रकला ॥ ३ ॥

ती आमची प्रियसखी तोच परमेश्वर पति व्हावा या इच्छेनें महेंद्रप्रमुखलोकपालांचा त्याग करून तपश्चर्या करीत आहे. आणखी मन्मथदाह झाल्यादिवसापासून पित्याच्या घरीं जाऊन फार उत्कंठित झाली आहे.

नंदी.—ती कशी बरें, सांगा.

जया.—ती अशी—

आर्या.

फटफटित पांढरी कृश वदनसरोजास खालती घाली।
पार्वतिनीलनी पशुपतिभानुवियोगेंचि खिन्न बहु झाली ॥ ४ ॥

**नंदी** । ततः कथमासीद्वां प्रियसखी।

**जया** । अदो वरं सुणु । ( १ )

श्लोकः ।

**चच्चव्वापिदचंदणद्दिपवणप्पस्सण्ण संमण्णए**
**सज्जं पल्लवकंपिदण्ण सहदे चंदावअं णिंदइ ।**
**णो वा प्पोम्मपलासणिम्मिअतणुप्पावारमक्खंमए**
**सा णीहारसिळाअळे सुणु वरं तावादुरा वट्टई ॥ ५ ॥** (२)

**नंदी** । एवं प्रबलज्वरा सा पश्चात्किं कृतवती ।

**उभे** । पच्छा किंवि उवाअं अदेक्खंती तवच्चरणेहिं परमेस्सरं अहिमुखीकादुं पउत्ता तहा तिव्वणिअमं करेइ । ( ३ )

---

१ अतः परं शृणु ।

२ अश्वव्यापृतचंदनाद्रिपवनस्पर्शं न संमन्यते
शय्यां पल्लवकल्पितां न सहते चंद्रातपं निंदति ।
नो वा पद्मपलाशनिर्मिततनुप्रावारमक्षम्यते
सा नीहारशिलातले शृणु परं तापातुरा वर्तते ॥ ५ ॥

३ पश्चात्कमप्युपायमपश्यंती तपश्चरणैः परमेश्वरमभिमुखीकर्तुं प्रवृत्ता तथा तीव्रनियमं करोति ।

नंदी.—आतां ती तुमची प्रियसखी काय करिते?

जया.—पुढें सांगतें ऐका—

श्लोक.

शश्वद्व्यापृतचंदनाद्रिपवनस्पर्शा[1] न संमानिते
शय्या पल्लवकल्पिताहि न च घे चंद्रातपा[2] निंदिते ।
दुःखें पद्मपलाशनिर्मिततनुप्रावारही[3] टाकिते
ती नीहारशिलातलावरि[4] सदा तापातुरा[5] वर्तते[6] ॥ ५ ॥

नंदी.—जिला प्रबल संताप झाला अशा तुमच्या प्रियसखीनें पुढें काय केलें?

दोघी.—दुसरा कोणता उपाय दिसेना ह्मणून तपश्चर्येनेंच परमेश्वरप्रसाद जोडावा, या हेतूनें ती कठीण व्रतनियम करीत आहे.

---

१ नेहमीं वाहणारा मलयपर्वतसंबंधी वायु त्याचा स्पर्श.

२ चांदण्यास. ३ शरीरास आच्छादन—पांघरूण. ४ बर्फाच्या शिळे-वर. ५ विरहतापानें संतप्त झालेली. ६ निजते—वसते.

**नंदी** । तत्किमनेन संदिग्धफलेन दुर्लभवस्तुप्रार्थनानिबंधनेन । देवेष्वियं कंचिदनुरूपं वरं वृणीयताम् । अयं पुनः खंडपरशुरग्रणीरेव वीतरागाणाम् । तद्बुद्धिमुपदिशतां भवत्यौ सख्यौ ।

**जया** । भअवं एदं अह्माणं प्पिअसहीए वव्वसिदं जहा परमेस्सरं एव्व पइं लहेअं अण्णहा अत्थ एव्व सिहरे कठिणेहिं तवच्चरणेहिं विलीणा भवेअं त्ति । ( १ )

**नंदी** । आत्मगतम् । श्रुतं श्रोतव्यम् । तमिमं वृत्तांतं नीललोहिताय निवेदयामि । प्रकाशम् । भद्रे यथागतं गमिष्यामः । इति निष्क्रान्तः ।

**जया** । अह्मेवि प्पिअसहीए पुआपुप्फाइं उवहरामो । ( २ )

इति निष्क्रांते । मिश्रविष्कंभकः ।

---

१ भगवन्नेतदस्माकं प्रियसख्या व्यवसितं यथा परमेश्वरमेव पतिं लभेयम् । अन्यथात्रैव शिखरे कठिनैस्तपश्चरणैर्विलीना भवेयमिति ।

२ आवामपि प्रियसख्याः पूजापुष्पाण्युपहरावः ।

**नंदी.**—दुर्लभ वस्तूची इच्छा धरून बसणें यांत फलप्राप्तीचा संदेह आहे. तसें कशाला करिते. दुसरे देव नाहींत काय? इंद्रादिदेवांतून कोणी तरी अनुरूप वर पाहून तो तिनें वरावा, हें बरें दिसतें. हा खंडपरशु तर महावैराग्यशील. यापासून मनोरथप्राप्ति कशी होईल. तुह्मी तिच्या सख्या आहां, तुह्मी तिच्या बुद्धीला उपदेश करा.

**जया.**—हे महामुने, आतां उपदेश करण्याचा अवधि राहिला नाहीं. आमच्या प्रियसखीचा असा दृढ निश्चय झाला आहे कीं, मिळवीन तर परमेश्वरच पति मिळवीन. नाहीं तर याच शिखरावर कठीण तपश्चरणानें प्राणत्याग करीन.

**नंदी.**—(मनांत ह्मणतो) जें ऐकावयाचें होतें तें ऐकिलें. आतां हा वृत्तांत नीललोहिताला जाऊन सांगतो. (उघडपणें) बरें तर भद्रे, आतां मी आल्या मार्गानें जातो. (असें बोलून निघून जातो.)

**जया.**—चल गडे आपणही प्रियसखीला पूजेकरितां फुलें नेऊन देऊं. (असें बोलून दोघी निघून जातात.)

(हा विष्कंभक ह्म० उत्तरकथासूचक भाग.)

ततः प्रविशति नैष्ठिकभूमिकावलंबी शंकरः ।

शंकरः । आत्मानं निर्वर्ण्य । पर्याप्तियं भूमिका पार्वतीं प्रति-
प्रतारयितुम् । तथा हि ।

श्लोकः ।

अंसे कृष्णाजिनश्रीस्त्रिगुणविरचिता मेखला श्रोणिभागे
पाणावाषाढदंडो भसितविरचितं पुंड्रकं भालदेशे ।
दर्भैः क्लृप्तं पवित्रं श्रवसि परिणमन्मानतुंगी पिशंगी
मौलौ पंक्तिर्जटानां जपवलयमिदं स्फाटिकं च प्रकोष्ठे ॥ ६ ॥

विचिंत्य ।

श्लोकः ।

यत्सा मन्मथमोहनास्त्रसमयं सापत्रपा चारुणा
वक्त्रेण स्मितफुल्लगंडफलकं व्रीडाविलोलेक्षणम् ।
उन्मीलत्पुलकांकुरं स्थितवती प्रागेव रूपांतरं
तन्वी तत्पुनरद्य चेतसि मम प्रादुर्भवत्यंजसा ॥ ७ ॥

तदिदानीमेव गाढतरतरणिकिरणपरिक्लांतामिव मेदिनीमेधः कठिनतपोविशेषतप्तामभ्युपपत्स्ये । यदेवं जयाविजयाभ्यां निवेदितो भावबंधस्तस्याः नंदिना मह्यमर्पितस्तदेवमात्मानमपाकर्तुमिवावधारयामि । इति सविनयं परिक्रामति ।

(तदनंतर ब्रह्मचारिवेषधरणारा शंकर येतो.)

**शंकर.**–(आपल्या देहाकडे पाहून) पार्वतीला ठकवायास हा वेष पुरे आहे. तो असा–

ओंव्या.

**कृष्णाजिन असें स्कंधदेशीं। त्रिगुण मेखला श्रोणिप्रदेशीं।**
**पालाशदंड हस्तसुदेशीं। भस्म त्रिपुंड्र कपाळीं॥ १॥**
**दर्भपवित्र अंगुलीधरी जटा मोकळ्या मस्तकावरी।**
**ज्या लोंबती कर्णोपरी। स्फटिकवलय मणगटीं॥ २॥ ६॥**

(चिंतन करून.)

श्लोक.

**जी आली मदनास्त्र होउनि मला मोहावया सुंदरी**
**मातें पाहुनि लाजली सुनयना डोळे करीना वरी।**
**झाली जी पुलकांकिता जणु उभी घेऊनि वेषांतरा**
**ती तन्वी मज आज फार सुखवी येऊनि त्हृन्मंदिरा॥ ७॥**

तर यासमयींच सूर्याच्या तीव्र किरणांनीं जशी पृथ्वी, तशी जी कठिण तपाच्या योगानें संतप्त झालेली गौरी तिच्या जवळ जातों. कां कीं, जयाविजया ह्यांनीं तिचा मनोभाव आणि निर्बंध जो नंदीपाशीं सांगितला, तो नंदीनें मला कळविला आहे. आतां मी कोण हें तिला न समजूं देतां जवळ जावें हें बरें. (असें बोलून विनयानें पुढें जातो.)

ततः प्रविशति जयाविजयाभ्यामन्वास्यमाना तपस्यंती पार्वती ।

**पार्वती** । वामाक्षिस्पंदनं सूचयित्वा । हळा सहिओ ।

गीतिः ।

**आणंदवाहसिसिरं अकालणं फुरइ लोअणं वामं ।**
**मह मंदभाइणीए जाअइए अस्स अज्ज किंणु फळं ॥८॥**(१)

**जया** । हळा पव्वइ इत्थिआणं वामक्खिचळणं पुरिसाणं दक्खिणाक्खिचळणं सुउणं त्ति पउराणिआ भणंदि । तहा मंमहदाहणिक्करुणोवि परमेस्सरो कस्सवि मुणिणो मुहेण तुमं अणुगिण्हिस्सदि ( ? ) । (२)

**पार्वती** । सच्चं होदु प्पिअसहीए वअणं । (३)

**विजया** । सच्चं भणिदं सहीए जआए । (४)

**शंकरः** । पार्वतीं दृष्ट्वा ।

---

१ हला प्रियसख्यौ ।
आनंदवाहशिशिरमकारणं स्फुरति लोचनं वामम् ।
मम मंदभागिन्या जायतेस्याद्य किं नु फलम् ॥ ८ ॥

२ सखि पार्वति स्त्रीणां वामाक्षिचलनं पुरुषाणां दक्षिणाक्षिचलनं सुगुणमिति पौराणिका भणंति । तथा मन्मथदाहानिष्करुणोपि परमेश्वरः कस्यापि मुनेर्मुखेन त्वामनुग्रहीष्यति ।

३ सत्यं भवतु प्रियसख्या वचनम् ।

४ सत्यमुक्तं सख्या जयया ।

(इतक्यामध्यें जया आणि विजया ह्या दोन सख्या बरो-
बर घेऊन तपकरणारी पार्वती येते.)

**पार्वती.**–( डावा डोळा लवलासें करून. ) अगे सख्यांनो,–

आर्या.

**कारण नसतां होतें कां माझ्या स्फुरण वामनयनाचें ।**
**मज मंदभागिनीला न कळे होणार काय फळ याचें ॥ ८ ॥**

**जया.**–अगे पार्वती, स्त्रियांचा डावा डोळा आणि पुरुषांचा उजवा डोळा लवणें हें शुभसूचक आहे, असें पुराणवेत्ते सांगतात. यावरून मला वाटतें, मन्मथदाहानें निष्करुण झालेला असाही परमेश्वर प्रसन्न होऊन कोणा तरी एखाद्या मुनीच्या मुखानें तुजवर अनुग्रह करील.

**पार्वती.**–परमेश्वर करो, माझ्या प्रियसखीचें भाषण खरें होवो.

**विजया.**–जयासखीनें खरी गोष्ट सांगितली.

**शंकर.**–( पार्वतीला पाहून. )

गीतिः ।

**क्वेदं तपः कठोरं क्वेदं सुकुमारमंगमबलायाः ।**
**दिवसः कुत्र घनोष्मा कुत्र कला कमलकोमला चांद्री ॥९॥**

अहो महत्तपःक्लेशमनुभवति मामुद्दिश्य मंजुभाषिणी ।

**जया** । विलोक्य । हळा पव्वइ गहिअतणूविअ पुडमस्समो जुवा कोवि महापुरिसो इदो मुहो आअच्छइ । ( १ )

**पार्वती** । आअदाणं अदिहीणं तुह्मेहिं अच्चणा कादव्वा अहं । उण जहा पुव्वं णिअमं अणुचिट्ठामि । (२) इति मौनमालंबते ।

**शंकरः** । निर्वर्ण्य ।

आर्या ।

**आभाति वल्कलवती पांडुक्षामा मदीयविरहेण ।**
**प्रतिपत्कलेव चांद्री सध्याशकलेन संवीता ॥ १० ॥**

इति समीपमुपसर्पति ।

---

१ सखि पार्वति गृहीततनुरिव प्रथमाश्रमो युवा कोपि महापुरूषो इतोमुख आगच्छति ।

२ आगतानामतिथीनां युवाभ्यामर्चना कर्तव्या । अहं पुनर्यथापूर्वं नियम-मनुतिष्ठामि ।

253302

आर्या.

**कोठें कठिण तपस्या कोठें अबलाशरीर सुकुमार ।**

**कोठें मृदु चंद्रकला कोठें ग्रीष्मार्क जो तपे फार ॥ ९ ॥**

काय हो ही कोमलांगी मंजुभाषिणी माझ्या उद्देशानें तपाचे मोठे क्लेश अनुभविते !

**जया.**—(अवलोकन करून) सखी पार्वती, जणु मूर्तिमंत प्रथमाश्रम[१] असा कोणी तरुण महापुरुष इकडेसच येत आहे, तो पाहा.

**पार्वती.**—सख्यांनो, आलेल्या अतिथीचें पूजन तुह्मी करावें. मी तर पहिल्याप्रमाणें नियम धरून बसतें (असें ह्मणून मौन धरून बसते.)

**शंकर.**—(निरखून पाहून)—

आर्या.

**जरि ही वल्कें ल्याली मद्विरहें पांढरी कृशहि झाली ।**

**प्रतिपच्चंद्रकला तशि शोभे संध्यांशुकास जी ल्याली ॥ १० ॥**

(असें ह्मणून जवळ जातो.)

---

१ ब्रह्मचार्याश्रम.

**जयाविजये** । विष्टरमुपनयतः ।

**शंकरः** । उपविश्य । मार्गखेदं नाटयति ।

**पार्वती** । सख्यौ विलोकयति ।

**सख्यौ** । वर्णिनं तालवृंतेन वीजयतः ।

**शंकरः** । हस्तमुद्यम्य गतः श्रमोस्माकमनन्यसामान्येन भवतीनां सौजन्येन ।

**उभे** । सविनयम् । कुदो आअच्छदि महापुरिसो । ( १ )

**शंकरः** । अद्य कैलासादागम्यते ।

**जया** । जइ एव्वं अग्घं पडिगेण्हादु महापुरिसो । (२)

**शंकरः** । तथेत्यर्घ्यप्रतिग्रहं रूपयित्वा । भद्रे एकं प्रष्टुमभिलषामो भवत्यौ ।

**जया** । पुच्छदु महापुरिसो । (३)

---

१ कुत आगच्छति महापुरुषः ।
२ यद्येवं अर्घ्यं प्रतिगृह्णातु महापुरुषः ।
३ पृच्छतु महापुरुषः ।

**जया विजया.**—(आसन आणून देतात.) यावर बसावें, महाराज.

**शंकर.**—(आसनावर बसून, मार्गांत श्रम फार झाले असें दाखवितो. )

**पार्वती.**—(आपल्या सख्यांकडे अवलोकिते. )

**सख्या.**—(त्या ब्रह्मचाऱ्याला ताडाच्या पंख्यानें वारा घालितात. )

**शंकर.**—( वर हात उचलून ) पुरे पुरे, या तुमच्या विशेष सौजन्यानेंच आमचा श्रम गेला.

**दोघी.**—(विनयें करून ) महापुरुषाचें आगमन कोणीकडून झालें ?

**शंकर.**—आज मी कैलास पर्वतापासून आलों.

**जया.**—जर असें आहे, तर महापुरुषानें अर्घ्यप्रतिग्रह करावा.

**शंकर.**—बरें आहे, ( असें ह्मणून अर्घ्यप्रतिग्रह करून ह्मणतो. ) भद्रे, एक गोष्ट तुह्मांस विचारावयाची माझ्या मनांत आली आहे.

**जया.**—विचारावी, महापुरुषानें कोणती ती.

**शंकरः** । कस्येयं दुहिता के भवत्यौ किंनिमित्तं वा कठोरे तपसि वर्तते ।

**जया** । एसा णो प्पिअसही हिमवदस्स कण्णआ पव्वइणामहेआ । अह्मेवि स्से प्पिअसहीओ जआविजए अणुरूववरलाहणिमित्तं अस्से तवच्चरणं । (१)

**शंकरः** ।

श्लोकः ।

**जन्मान्ववाये प्रथमस्य धातुः**
**पिता गरीयान्गिरिसार्वभौमः ।**
**वपुर्मनोहारि वचश्च रम्यं**
**पदं च लोकादतिलोकमस्याः ॥ ११ ॥**

तत्किमनया प्रार्थनीयो वरस्त्रिलोक्याम् ।

**जया** । अत्थि कोवि महापुरिसो । (२)

**शंकरः** । कोसावात्मसौभाग्यविशेषदुर्विदग्धः कठिणहृदयः ।

---

१ एषा नौ प्रियसखी हिमवतः कन्यका पार्वतीनामधेया । आवामप्यस्याः प्रियसख्यौ जयाविजये अनुरूपवरलाभनिमित्तं चास्यास्तपश्चरणम् ।

२ अस्ति कोपि महापुरुषः ।

**शंकर.**–ही कन्या कोणाची, तुह्मी कोण, आणि ही इतकें कठीण तप कोणत्या निमित्तानें करीत आहे ?

**जया.**–ही आमची प्रियसखी हिमवंताची कन्या, हिला पार्वती असें ह्मणतात. आह्मी हिच्या प्रियसख्याच आहों. माझें नांव जया आणि दुसरी ही विजया. अनुरूप पति मिळावा या निमित्तानेंच हिचें तपश्चरण आहे.

**शंकर.**–( विस्मय करून )–

श्लोक.

**आहे हिचें श्रेष्ठकुलांत जन्म**
**हीचा पिताही गिरिसार्वभौम ।**
**वपू मनोहारि सुरम्य वाणी**
**श्रेष्ठत्व अन्यास उणीव आणी ॥ ११ ॥**

असें असून हिनें वराची प्रार्थना करावी, असा वर या त्रैलोक्यांत कोणी आहे काय ?

**जया.**–असाच कोणी महापुरुष आहे.

**शंकर.**–कोण वरें तो? जो आपल्या ऐश्वर्यमदानें फुगलेला आणि कठीण हृदयाचा ?

**जया** । महापुरिस सुणु दाव । जं किल भणंदि वेआ इति पठित्वा तं एव्व परमेस्सरं अहिलसंदी णो ण्पिअसही तवोणिअमं अणुचिट्ठइ । (२)

**शंकरः** । पार्वतीं प्रति । भद्रे अपि सत्यमेतत् ।

**पार्वती** । मौनमुन्मुच्य । महापुरिस जहा आअक्खिदं सहीहिं तहा मे मणोरहो । (१)

**शंकरः** । आत्मगतम् । इदानीमात्मनिंदनैरपि चित्तमस्याः परीक्षिष्ये । प्रकाशम् । सहस्ततालं प्रहस्य ।

श्लोकः ।

**आलेपो भसितं विभूषितमहिर्वासः पितॄणां वने**
**वेतालाः परिचारकाः प्रतिदिनं वृत्तिश्च भिक्षामयी ।**
**इत्थं यस्य शुभेतराणि चरितान्याख्यांति सर्वे जना-**
**स्तस्मिन्मौग्ध्यवशान्मतिस्तव रुचिं बध्नाति किं ब्रूमहे ॥१२॥**

---

२ महापुरुष श्रूयतां तावत् । यं किल भणंति वेदा इति पठित्वा तमेव परमेश्वरमभिलषंती नौ प्रियसखी तपोनियममनुतिष्ठति ।

१ महापुरुष यथा आख्यातं सखीभ्यां तथा मे मनोरथः ।

जया.—ऐकावें महाराज, सांगतें कोण तो. "ज्यातें वेद ह्मणति हा नित्य युवा" इत्यादि पूर्वोक्त आर्या ह्मणून त्याच परमेश्वराचा अभिलाष मनांत धरून आमची प्रियसखी तपोनियमाचें अनुष्ठान करीत आहे.

शंकर.—( पार्वतीला ह्म० ) भद्रे, हें खरें आहे कायगे ?

पार्वती.—( मौन सोडून ) हे महापुरुषा, जसें माझ्या सख्यांनीं सांगितलें तसाच माझा मनोरथ आहे.

शंकर.—( आपल्या मनांत ह्म० ) आतां आत्मनिंदा करण्यानें हिच्या चित्ताची परीक्षा करितों. ( उघडपणें टाळी बाजवून हास्य करून ह्म० )—

पद साक्या.

कां भुललिस गिरिजे। तयाला कां भुललिस गिरिजे॥ ध्रु०॥
भस्मचितेंतिल घेउनियां जो फांशी सर्वांगाला।
कंठीं कानीं करीं मस्तकीं सर्पभूषणें ज्याला ॥ १ ॥ कां० ॥
अगडबंब गोसावी होउनि मसणवटींतचि राहे।
परिचारक वेताळ जयाचे ऐसा वेडा आहे ॥ २ ॥ कां० ॥
व्याघ्रांबर पांघरतो किंवा घेतो वनगजकृत्ती[१]।

---

१ गजचर्म.

अन्यच्च ।

श्लोकः ।

जगत्त्रयीलोचनबालचंद्रिका
कुलस्य रत्नं भवती क्व भूभृतः ।
क्व कृत्तिवासाः पितृकानने वस-
न्नमंगलाचाररतिस्त्रिलोचनः ॥ १३ ॥

**पार्वती** । कर्णौ पिधाय । संतं पावं संतं पावं । ( १ )

**शंकरः** । यद्येवं ते मनसि दृढतरो निश्चयः। तर्हि ।

श्लोकः ।

विधुंतुदं चांद्रमसी यदि कामयते कला ।
वरं वृणीताद्भवती संप्रत्येव पिनाकिनम् ॥ १४ ॥

**पार्वती** । मुखवैवर्ण्यं निरूपयित्वा ।

१ शांत पापं शांत पापम् ।

प्रतिदिवशीं उदराच्या भरणा करितो भिक्षावृत्ती ॥३॥ कां०॥
ऐसें ज्याचें अशुभ आचरण सर्व जनाला ठावें ।
त्यावर वेडे प्रीति ठेविशी तुजला काय ह्मणावें ॥ ४ ॥
कां भुललिस गिरिजे । तयाला कां भुललिस गिरिजे ॥धु० १२॥

आणखी ऐक.—

श्लोक.

कोठें जगल्लोचन बालचंद्रिका
तूं त्या गिरीची कुलवेश्मदीपिका ।
कोठें स्मशानींच जयास भोजन
अमंगलाचार असा त्रिलोचन ॥ १३ ॥

पार्वती.—( कानांत बोटें घालून ) इडा पिडा टळो, अमंगळ पळो. शिव शिव काय भाषण हें !

शंकर.—असाच जर तुझा दृढ निश्चय आहे तर—

आर्या.

लोकीं जरि हें घडतें चंद्रकला इच्छितेच राहुशिर ।
तरि तूं निःशंक वरीं पति त्रिलोचन न लावितां उशिर॥१४॥

पार्वती.—( तोंड उतरल्यासारखें करून, )

गीतिः ।

मं वखु कुव्वंति णिअमात्सअलाव्वि मउलिणा णमक्कारं ।
तं गिरिसं णिंदतो किं णु तुह जीहा ण होइ णिब्भिण्णा ॥१५॥

हळा सहि महापुरिसाणिंदाकालिणं तारिसं पावं जारिसं सुणु दावणं । एस उण बह्मणो ईस्सरणिंदाणिरंकुसमुहो ता अण्णदो सरामो । (१) इति विस्रंसमानवल्कलमन्यतः परावर्तते ।

**शंकरः** । स्वरूपं प्रकाश्य ।

गीतिः ।

**परिणाहि स्तनयुगलं कृशमवलग्नं क्षमेत किं गिरिजे ।**
**तव हस्तदानचतुरस्तपसा हि कृतोयमस्मि दासजनः ॥१६ ॥**

इति पार्वत्या हस्तमवलंबते ।

**पार्वती** । सभयविस्मयप्रहर्षम् । पुलकिततनुः प्रस्विन्नगंडी प्रतिपत्तिमूढा तिष्ठति ।

---

१ यं खलु कुर्वंति नियमात्सकला अपि मौलिनो नमस्कारम् ।
तं गिरिशं निंदतः किं नु खलु तव जिव्हा न भवति निर्भिन्ना ॥ १५ ॥
हला सखि महापुरुषनिंदाकारिणं तादृशं पापं यादृशं शृणु तावदेनम् । एष पुनर्ब्राह्मण ईश्वरनिंदानिरंकुशमुखस्तदन्यतः सरामः ।

आर्या.

**ज्यातें सर्वहि नियमें आराधिति सर्वकाळ नमनांहीं ।**
**त्या गिरिशातें निंदिसि जीभ तुझी फाटली कशी नाहीं ॥१५॥**

अगे सख्यांनो, हा महापुरुष असून पापपुरुषाप्रमाणें महापुरुषाची निंदा कशी करीत आहे ऐका. असो, हा ब्राह्मण ईश्वरनिंदा करण्याविषयीं निरंकुश आहे तर आपणच येथून दुसरीकडे जाऊं. (असें बोलून शिथिल झालेलें वल्कल सांवरून दुसरीकडे जाऊं लागते. )

**शंकर.**–( आपलें स्वरूप प्रकट करून ) थांब थांब.

आर्या.

**स्तनयुगुलभार मोठा कृश कटि सोशील गे कशी यास ।**
**हात हळुच तुज देतों मी झालों त्वत्तपें तुझा दास ॥ १६ ॥**

(असें बोलून पार्वतीचा हात धरितो.)

**पार्वती.**–(भय, विस्मय आणि प्रहर्ष यांनीं युक्त, पुलकिततनु, प्रस्विन्न गात्री आणि कर्तव्यतेविषयीं मूढ, अशी होऊन उभी राहते. )

**जया ।** प्पिअं णो प्पिअं णो । संण्णिहिदो परमेस्सरो अह्माणं सक्कम्मपालिणामेण । ( १ )

**शंकरः ।**

गीतिः ।

**आविःश्रमांबुकणिकामंगलतां गाढमंकुरत्पुलकाम् ।**
**मंडितपयोधरां त्वामालिंग्य कृती भवाम्यहं गिरिजे ॥ १७**

तदिमां गांधर्वेण विवाहेन पाणौ कर्तुमभिलषामि ।

**जया ।** भअवं अह्माणं पथ्थणा तुए कादव्वा । जहा सअलकुलाचलचक्कवट्ठिणो तादस्स हिमवदस्स घराणिम्मिअविवाहकज्जोपत्थातुं मं पडिच्छ । ( २ )

**शंकरः ।** सनिर्वेदम् । आत्मगतम् । इतःपरं कथमिमां वर्तिष्ये । प्रकाशम् । भवतु लोकयात्रा न हातव्या ।

---

१ प्रियं नः प्रियं नः । संनिहितः परमेश्वरोस्माकं सत्कर्मपरिणामेन ।

२ भगवन्नस्माकं प्रार्थना त्वया कर्तव्या । यथा सकलकुलाचलचक्रवर्तिनस्तातस्य हिमवतो गृहानिर्मितविवाहकार्ये उपस्थातुं मां प्रतीच्छ ।

**जया.**–( पाहून ) वाहवा ! आमचें प्रिय झालें, आमचें प्रिय झालें. आमचें सत्कर्म फळास येऊन परमेश्वराचें सांनिध्य झालें.

**शंकर.**–( पार्वतीस ह्मणतो )–

आर्या.

**घर्मांबुबिंदु तनुवरि उठले रोमांच दिसति कुच पीन।**
**गिरिजे अशीस तुज मी आलिंगुनि गाढ धन्य होईन॥१७॥**

(सखीला ह्मणतो ) आतां गांधर्वविधीनें हिचें पाणिग्रहण करावयास मी इच्छितों.

**जया.**–हे भगवंता, आमची एक प्रार्थना आपणास आहे ती पूर्ण करावी. ती हीच कीं, सकलकुलाचलचक्रवर्ती जो हिचा पिता हिमवान् त्याच्या घरीं विवाहसमारंभ होईल अशी योजना करण्याविषयीं मला आज्ञा द्यावी.

**शंकर.**–( अंमळ वाईट वाटल्यासारखें करून मनांत ह्म० ) आतां काय सांगावें हिला. ( उघडपणें ) बरें तसें कां होईना; लोकसंप्रदाय कशासाठीं मोडावा. पण त्वरा कर.

**जया** । पंचदिवसमब्भंतरे जहा विवाहमगळं भविस्सदि तहा-
करीअदु । (१)

**शंकरः** । त्रिचतुरदिवसाभ्यंतर इति वक्तव्यम् । तथा हि ।

श्लोकः ।

**क्षणमपि विरहे मम प्रियायाः**
**कलयति कल्पसहस्रकोटिसाम्यम् ।**
**कतिपयदिवसप्रयोगमेनं**
**कथमिव हंत सहिष्यते मनो मे ॥ १८ ॥**

इति पार्वत्या हस्तं मुंचति ।

**जया** । अह्मे गच्छामो विवाहमंगळं संवादेदुं । (२)

**शंकरः** । तथा क्रियताम् । वयमपि सप्तर्षीन्विवाहमंगलाय प्रेष-
यितुं गमिष्यामः । इति निष्क्रान्ताः सर्वे ॥

इति पार्वतीपरिणये नाटके चतुर्थोंकः ॥

---

१ पंचदिवसमभ्यंतरे यथा विवाहमंगलं भविष्यति तथा क्रियताम् ॥
(२) वयं गच्छामो विवाहमंगलं संपादयितुम् ।

**जया.**—पांच दिवसांच्या आंत विवाहमंगलकार्य होईल असें करावें.

**शंकर.**—तीन चार दिवसांच्या आंत असें ह्मण. कां कीं.—

श्लोक.

**क्षणभरिहि वियोग मत्प्रियेचा**
**गणिलचि कल्पशतासमान साचा ।**
**बहु दिन जरि लागतील याला**
**सहन कसें करवेल या मनाला ॥ १८ ॥**

( असें ह्मणून पार्वतीचा हात सोडतो. )

**जया.**—आतां आह्मी विवाहमंगल संपादावयास जातों.

**शंकर.**—बरें तसें करावें. आह्मीही विवाहमंगलाकरितां सप्तऋषींस पाठविण्यासाठीं जातों.

( इतकें झाल्यावर सर्व निघून जातात. )

**चतुर्थ अंक समाप्त.**

# अंकः ५ ।

ततः प्रविशाति कंचुकी ।

**कंचुकी** । आज्ञप्तोऽस्मि सकलकुलाचलचक्रवर्त्तिना हिमवता । यथा । शिलाधर पूर्वेद्युरेव परमेश्वरप्रहिताः सारुंधतीकाः सप्तर्षयः समागत्य लब्धवराया वत्साया दिनमिदं विवाहमंगलयोग्यमकल्पयन् । तद्भवता चौषधिप्रस्थवासिनः पौराः पुरं परिष्क्रियतामिति नियोक्तव्या इति । तत्प्रभोर्नियोगमनुतिष्ठामि । इति परिक्रम्य सर्वतोवलोक्य । भो भो पैराः ।

श्लोकः ।

**संनह्यंतां विचित्राः प्रतिभवनमिह श्रेणयस्तोरणाना**
**मुन्नम्यंतां समंताद्गगनतललिहः केतनानां पताकाः ।**
**संसिच्यंतां पटीरद्रवभरितजलैर्वीथयो मुक्तपुष्पाः**
**संप्राप्तोसावुमायाः परिणयदिवसो विश्वमांगल्यहेतुः ॥ १ ॥**

## अंक ५.

( तदनंतर प्रथम कंचुकी येतो. )

**कंचुकी.**—सकलकुलाचलचक्रवर्ती जो हिमवान् त्यानें मला आज्ञा केली आहे कीं, अरे शिलाधरा, परमेश्वरानें पाठविल्यावरून अरुंधतीसह सप्तऋषि कालच येथें आले, त्यांनीं लब्धवरा जी माझी कन्या गौरी तिच्या विवाहमंगलास योग्य असा आजचाच सुमुहूर्त नेमिला आहे यासाठीं त्वां औषधिप्रस्थनगरांत राहणारे जे पौरजन त्यांस आज्ञा करावी कीं, नगर अलंकृत करावें ह्मणून. तर प्रभूच्या आज्ञेप्रमाणें करतों ( असें बोलून इकडे तिकडे फिरून चोहोंकडे पाहून ह्मणतो. ) अहो पौरजनहो, ऐका प्रभूची आज्ञा.

अभंग.

तोरणांच्या पंक्ती द्वाराशी बांधाव्या ।
गुढ्या उभाराव्या घरोघर ॥ १ ॥
जलपूर्ण कुंभ आणोनी ठेवावे ।
पानांनीं झांकावे आंब्याच्या ते ॥ २ ॥
भीजवावें पुरमार्ग चोंहींकडे ।
चंदनाचे सडे वालोनीयां ॥ ३ ॥

आकाशे । किं ब्रूथ । भगवद्वचनात्प्रागेव सर्वमस्माभिर्द्विगुण-
माचरितमिति ।

सर्वतो निर्वर्ण्य सहर्षम् । अहो अस्मदादेशात्प्रागेव प्रवृत्तम
होत्सवं नगरम् । तथा हि ।

श्लोकः ।

एषा चंदनमालिका विरचिता चूतप्रवालैर्नवै
रंभास्तंभपरिष्कृतेषु भवनद्वारेषु संलक्ष्यते ।
आमंद्रध्वनयः क्वणंति मुरजा मूर्छंति तंत्रीस्वराः
सिंजानैर्मणिभूषणैस्तत इतो नृत्यंति वारांगनाः ॥२॥

इतश्च ।

श्लोकः ।

उत्सर्पदागरवधूपपरंपराभिः
प्रादुर्भवत्यभिनवो जलदागमोयम् ।
उन्नद्धतोरणमणिप्रभया स्फुरत्या
संजायते च शतमन्युशरासनश्रीः ॥ ३ ॥

आला हा गौरीच्या लग्नाचा दिवस ।
हेतू हा जगास मंगलाचा ॥ ४ ॥ १ ॥

(आकाशाकडे कान देऊन) काय ह्मणतां? प्रभूची आ-होण्यापूर्वींच तुमच्या सांगण्यापेक्षां दुप्पट शोभा आह्मी केली आहे असें ह्मणतां काय ?

( चोहोंकडे निरखून पाहून हर्षानें ह्मणतो ) अहो, आमची आज्ञा होण्याच्या पूर्वींच नगर शोभिवंत करण्याचा महोत्सव नगरांत जिकडे तिकडे चालू झाला आहे ! तो पाहा.

ओंव्या.

मंडप घातले राजमार्गीं । आम्रपल्लव जागोजागीं ।
भवनद्वारांच्या उभयभागीं । रंभास्तंभ उभविले ॥ १ ॥
मृदंगांचे ध्वनि ऊठती । वीणानाद मंजुळ होती ।
पायींचे पैंजण झमझमती नृत्य करिती वारांगना ॥ २ ॥२॥

इकडे पहावें तर काय चमत्कार दिसतो.

ओंव्या.

अगरु धूपाचे प्रचंड स्तोम । वर जाऊनि व्यापिती व्योम ।
अकाल जलदांचा आगम । झाला ऐसें भासविती ॥ १ ॥
मणिमय तोरणाच्या पंक्ती । त्यांचीं तेजें लखलखती ।
इंद्रधनूची शोभा देती । एकवटोनि आकाशीं ॥ २ ॥ ३ ॥

अन्यतश्चामूः ।

श्लोकः ।

धवलारुणमेचकैरपांगै-
रपि रामा रचयंति रंगवल्लीः ।
कुचयोर्युगुलेन पूर्णकुंभा-
न्पुनरुक्तानिव कुर्वते मृगाक्ष्यः ॥ ४ ॥

सर्वतोवलोक्य ।

श्लोकः ।

विक्षिप्तः सरभसमेष पौरलोकै-
र्विस्फूर्जत्कनकरजः पिशंगदीप्तिः ।
प्रत्यग्रद्युमणिमयूखजालशोभा-
माधत्ते दिशि दिशि कौंकुमः परागः ॥ ५ ॥

तदेनं प्रवर्तमानं पुरपरिष्कारं प्रभवे निवेदयामि ।

ततः प्रविशति विविक्तस्थानमधिवासन्हिमवान् ।

**हिम०** ।

श्लोकः ।

पूर्वं नारदसूचनेन महता चंद्रार्धचूडामणि-
र्जामातेत्यभवत्पुनस्तदनु तत्संप्राप्तिराकांक्षिता ।

दुसरीकडे ह्या स्त्रिया ।

श्लोक.

धवला[1]रुणनीलकांतिनेत्रा
युवती[2] काढिति रंगवल्लि[3] चित्रा ।
कुचकुंभ[4]युगेंचि पूर्णकुंभा
धरिती जिंकिति ऊरुनीं[5] सुरंभा[6] ॥ ४ ॥

( चोहोंकडे पाहून ह्मणतो )—

ओंवी.

पौरजनीं उधळिला गुलाल ।
तेणें आकाश जाहलें लाल ।
जाणो बालभानूचें किरणजाल ।
चोंहीकडे पसरलें ॥ १ ॥ ५ ॥

आतां नगर अलंकृत करण्याचा जो प्रकार जनांनीं चालविला आहे तो जाऊन प्रभूस कळवितों.

( इतक्यांत एकांतस्थानीं बसणारा असा हिमवान् येतो. )

**हिम.**—( आपल्या मनांत ह्मणतो )—

श्लोक.

**पूर्वीं नारद बोलिला तुज असो जामात हा धूर्जटी**
**तत्प्राप्त्यर्थ तपा करी मम सुता राहे वनीं एकटी ।**

---

१ पांढरी तांबडी काळी कांति ज्यांच्या नेत्रांस अशा. २ तरुणी स्त्रिया. ३ रांगोळी. ४ कुंभाकारस्तनयुगानें. ५ मांड्यांनीं. ६ कदलीस्तंभ.

**लब्धोसौ तपसोमया दिनमिदं तस्याश्च वैवाहिकं**
**जातो विघ्नगणानतीत्य कृतिनामद्याहमग्रेसरः ॥ ६ ॥**

**शिलाधरः** । उपसृत्य । जयतु स्वामी ।

**हिम०** । शिलाधर किं पुरपरिष्कारः प्रवर्तितो भवता ।

**शिला०** । स्वामिन्नस्मदीयोयमुत्सव इति प्रत्येकं पौराणामभिमानः कथं परिहीयते पुरपरिष्कारः । सर्वं द्विगुणमाचरितं पौरैः ।

**हिम०** । शिलाधर किं सर्वे पर्वताः पार्वतीपरिग्रहमंगलं द्रष्टुमागताः ।

**शिला०** । स्वामिन्नवधार्यताम् ।

श्लोकः ।

**भूपंकेरुहकर्णिकायिततनुर्मेरुः सुराणां प्रियो**
**योवत्रीभूतभुजंगराजकषणस्निग्धोपलो मंदरः ।**
**विन्ध्यो व्योमनि भानुमालिपदवीजंघालशृंगावलिः**
**साकं संप्रति गंधमादनमुखैस्त्वांद्रष्टुमभ्यागतः ॥ ७ ॥**

झाला तो तिजला प्रसन्न सुविवाहाचा अला वासर
विघ्नें वारुनि आज मी निवडलों धन्यांत अग्रेसर ॥ ६ ।

**शिलाधर.**–( जवळ जाऊन ) स्वामीचा जय असो.

**हिम.**०–( त्याजकडे पाहून ) अरे शिलाधरा, नगर अलंकृत करण्याचें काम चालू करविलें काय ?

**शिला.**०–स्वामिमहाराज, आमच्या सांगण्याची अपेक्षा पौरजनांनीं ठेविली नाहीं. जो तो ह्मणतो हा उत्सव आमच्या घरचा आहे. असा प्रत्येकास अभिमान आहे. मग नगरास अलंकार कसा नाहीं होणार ? आपल्या इच्छेच्या द्विगुणित पुरशोभा पौरजनांनीं केली आहे.

**हिम**०.–अरे शिलाधरा, पार्वतीचा पाणिग्रहणमंगलविधि पाहण्याकरितां सारे पर्वत आले काय ?

**शिला.**–ऐकावें महाराज.

श्लोक.

[1]भूपंकेरुहकर्णिकाकृतितनू तो मेरुनामा धर
घट्टे वासुकिनें जयास पडले तोही अला मंदर ।
ज्याचें मस्तक उंच भानु[2]वरही तो विंध्यही पावला
आले सर्वहि दूसरे गिरि तुझ्या प्रीत्यर्थ या मंगला ॥ ७ ॥

---

१ भू पृथ्वी तेंच पंकेरुह कमळ त्याची कर्णिका–मधला गड्डा त्याच्या आकाराची ज्याची तनु–शरीर असा.

२ सूर्याच्याही वर गेलें.

**हिम०** । अथ कैलासः किं करोति ।

**शिला०**। स्वामिन्स खलु जामातृपक्षस्थितेनैव सार्धमागमिष्यति ।

**हिम०** । युज्यते । अथ विश्वावसुप्रभृतय आगता गंधर्वाः सवधूगणाः ।

**शिला०** ।

श्लोकः।

**आतोद्यपाणयः सर्वे गंधर्वाः सवधूगणाः ।**
**उपवीणयितुं प्राप्ता मानयंतस्तवोत्सवम् ॥ ८ ॥**

**हिम०** । आगताः किमप्सरसः सार्धममरैः ।

**शिला०** । श्रूयताम् ।

श्लोकः ।

**विद्युद्वल्लीवितानव्यतिकरसुषुमां व्योम्नि विस्तारयंत्यः**
**कांत्या नीलोत्पलानां श्रियमिव नयनैर्दिङ्मुखे दर्शयंत्यः।**
**ज्योत्स्नालक्ष्मीं दिवापि स्मितरुचिविसरैर्विष्वगुत्पादयंत्यः**
**सर्वाः स्वर्वारयोषाः सममरगणैरागताः प्रीतये नः ॥ ९ ॥**

**हिम०** । यद्येवमंतःपुरं गत्वा भवान्कुलवृद्धां कौशिकीं पुरस्कृत्य समागताभिरप्सरोभिर्वत्सा पार्वती सम्यगलंक्रियतामित्यधत्ताम् । अलंक्रियाप्रकारं च कौशिकी समागत्य मह्य-

**हिम**०.—तर कैलासपर्वत कां आला नाहीं ? तो काय करीत आहे?

**शिला**०.—महाराज, तो वरपक्षाच्या मंडळीबरोबर येणार आहे.

**हिम**०.—हां, योग्यच आहे. बरें, विश्वावसुप्रभृति गंधर्व आपापल्या स्त्रियांसहवर्तमान आले काय?

**शिला**०.—ते केव्हांच आले.

आर्या.

**गंधर्व सर्व आले घेउनि वाद्यें वधूगणासहित ।**
**गायन करावयाला जें तुमच्या होय उत्सवास हित ॥८॥**

**हिम**०.—बरें शिलाधरा, अमरांसहवर्तमान अप्सरा आल्या काय?

**शिला**०.—ऐकावें.

श्लोक.

**शोभा विद्युल्लतांची निजवपुरुचिनीं आणित्या व्योममार्गीं**
**श्रीही नीलोत्पलांची विकसितनयनीं दावित्या दिग्विभागीं ।**
**ज्योत्स्नालक्ष्मी स्मितानीं दिवस असुनिहीं दावित्या ज्या जनाला**
**ऐशा स्वर्वारयोषा सुरगणसहिता पातल्या त्वद्गृहाला ॥९॥**

**हिम**०.—शिलाधरा, असें आहे तर तूं अंतःपुरांत जाऊन कुलवृद्धा जी कौशिकी तिला पुढें करून आलेल्या अप्सरांनीं वत्सा पार्वती अलंकृत करावी असें कर. आणि वत्सेचा अलंकारप्रकार कौशिकीनें स्वतां येऊन मला



माचष्टाम् । किं च आगतानां वधूनां गिरीणां च सत्कृतये तत्रभवता संविधातव्यः सकललोकवस्तुसंभारः ।

**शिला०** । यथादिष्टं स्वामिना तथा सर्वं संपादयिष्यामि । इति निष्क्रांतः ।

**प्रविश्य नारदः** ।

श्लोकः ।

**प्राज्ञया यदुपक्रांतं कार्यं गुरु दिवौकसाम् ।**
**अंतरायानतिक्रम्य तद्धि सिद्ध्यति सांप्रतम् ॥ १० ॥**

इति परिक्रम्यावलोक्य च । अयमध्यास्ते विवाहमंडपं हिमवान् । तदेनमुपसर्पामि । इत्युपसर्पति ।

**हिम०** । विलोक्य । अये नारदः । अंजलिं बध्नाति ।

**नारदः** । हिमवन्नभ्युदयः खलु तत्रभवतः ।

**हिम०** । भवदुपक्षिप्तस्य फलमिदं बीजस्य । इत्यासनमुपनयति ।

**नार०** । उपविशति ।

ततः प्रविशति कौशिकी ।

सांगावा. आणखी तुला सांगतों, आपल्या घरीं मंगल-कार्यास आलेले पर्वत, स्त्रिया, देव, मुनि इत्यादि त्यांच्या सत्कारासाठीं सर्व साहित्य घेऊन तूं स्वतां सिद्ध ऐस.

**शिला०.**—स्वामींनीं आज्ञा केली त्याप्रमाणेंच मी करीन.

(असें बोलून निघून जातो.)

**नारद**—.(प्रवेश करून मनांत ह्मणतो.)

श्लोक.

**जें म्यां आरंभिलें पूर्वीं देवांचें कार्य भासतें[1] ।**
**विघ्नें सर्व निवारूनी पावतें शेवटास तें ॥ १० ॥**

(असें बोलून पुढें जाऊन पाहून ह्मणतो.)

हा विवाहमंडपांत हिमवान् बसला आहे. तर त्याच्या जवळ मी जातों. (असें ह्मणून जवळ जातो.)

**हिम०.**—(अवलोकन करून) अहो हा नारदमुनि आला. (हात जोडतो.)

**नारद**—.हिमवंता, तुझा अभ्युदय असो.

**हिम०.**—आपण बीजारोपण केलें त्याचें हें फळ दृष्टीस पडत आहे. (असें बोलून नारदास आसन देतो.)

**नारद.**—(आसनावर बसतो.)

(इतक्यांत कौशिकी येते.)

---

१ तें शेवटास जातें असें वाटतें.

**कौशिकी** । उपविश्य । पार्वत्याः परिकर्मप्रकारं निर्दिशति ।

**हिम०** । किमलंकृता वत्सा ।
**कौशि०** । भगवन्कथयामि श्रूयताम् ।
**हिम०** । अवहितोस्मि ।
**कौशि०** ।

आर्या ।

**असमग्रभूषणायास्तनुतरकौशेयवासधारिण्याः ।**
**आलिप्तमंगमखिलं तैलेन सुगंधिना तस्याः ॥ ११ ॥**

**हिम०** । ततस्ततः ।
**कौशि०** ।

गीतिः ।

**मणिपीठवर्तिनीं तां मंगलशंखेषु मंद्रघोषेषु ।**
**अंभोभिरमरनद्याः सखीजनो विहितमज्जनां व्यतनोत् ॥१२॥**

**हिम०** । ततस्ततः ।
**कौशि०** ।

गीतिः ।

**मंगलमज्जनविशदा कर्पूरक्षोदपांडुरं क्षोमम् ।**
**साधत्त जलदधौता द्यौरिव शरदिंदुचंद्रिकोद्भेदम् ॥१३॥**

**कौशिकी**–(खालीं बसून पार्वतीच्या अलंकारांचे प्रकार सांगूं लागते.)

**हिम०.**–वत्सा गौरी अलंकृत केली काय?

**कौशि०.**–भगवन् तेंच सांगतें ऐकावें.

**हिम०.**–माझें लक्ष आहे, सांग.

**कौशि०.**–ऐकावें पहिल्यापासून.

आर्या.

काढून भूषणें तिस हलकें कौशेय वस्त्र नेसविलें ।
कुशलस्त्रीनीं तिच्या अंगास सुगंध तैल लावियलें ॥११॥

**हिम०.**–मग पुढें ?

**कौशि०.**–

आर्या.

बसवूनि रत्नपीठीं वाजत असतां सुमंगलें तूर्यें[1] ।
गंगोदकीं सख्यांनीं न्हाणियलें तिस न देखतां सूर्यें[2] ॥१२॥

**हिम०.**–मग पुढें ?

**कौशि०.**–

आर्या.

न्हाउनि निर्मळ झाली मग शुभ्र दुकूल नेसली दुहिता[3] ।
शोभे गतजलदद्यौ[4] जैशी शरदिंदुचंद्रिकासहिता[5][6] ॥१३॥

१ वाद्यें. २ छायेंत किंवा सूर्योदयापूर्वीं. ३ कन्या गौरी. ४ निरभ्र. ५ आकाश. ६ शरत्कालच्या स्वच्छ चांदण्यानें युक्त अशी द्यौ.

**हिम० ।** ततस्ततः ।

**कौशि० ।**

गीतिः ।

**चरणकमलं तदीयं लाक्षाबालातपेन संवलितम् ।**
**अध्यास्त भृंगमालावलिभिर्मणिखचितनूपुरव्याजात् ॥ १४ ॥**

**हिम० ।** ततस्ततः ।

**कौशि ० ।**

गीतिः ।

**बद्धा मणिमयकांची तस्याः परिणाहशालिनि नितंबे ।**
**पंक्तिरिव सारसानां सुरसरितः पुलिनमंडलाभोगे ॥ १५ ॥**

**हिम० ।** ततस्ततः ।

**कौशि० ।**

आर्या ।

**करतलयुगपरिणद्धे कुचकलशे कुंकुमारुणे तस्याः ।**
**सिंदूरिते करिपतेः कुंभे नक्षत्रमालेव ॥ १६ ॥**

**हि० ।** ततस्ततः ।

**कौशि० ।**

हिम०.—मग पुढें?

कौशि०.—

आर्या.

तच्चरणें कोकनदें[1] लाक्षाबालातपेंहि[2] आरक्त ।
त्यावरि मणिमयनूपुररूपानें भृंग[3] जाहले सक्त ॥ १४ ॥

हि०.—मग पुढें?

कौशि०.—

आर्या.

बांधिलि मणिमयकांची स्थूलनितंबावरि स्वयें तीच्या ।
पंक्तीच सारसांची[4] भासे पुलिनावरी सुरनदीच्या[5] ॥ १५ ॥

हिम०.—मग पुढें?

कौशि०.—

आर्या.

तीच्या कुंकुमचर्चित कुचकलशावरि सुरम्य मणिहार ।
सिंदूरलिप्तकरिपतिकुंभावरि[6] तेंवि शोभला फार ॥ १६ ॥

हिम०.—मग पुढें?

कौशि०.—

---

१ रक्त कमळें. २ लाखेचा रंग तोच बालातप म्ह० कोंवळें ऊन्ह. ३ भुंगे. ४ सारसपक्ष्यांची. ५ गंगेच्या. ६ गंडस्थळांवर.

आर्या ।

कमनीयतानिवासः कर्णस्तस्या विचित्रमणिभूषः ।
सविधप्रसूनरत्नं शंखनिधिं दूरतरमकरोत् ॥ १७ ॥

हिम० । ततस्ततः ।

कौशि० ।

गीतिः ।

मुक्ताताटंकयुगं प्रतिमुक्तं कर्णपार्श्वयोरस्याः ।
मुखकमलमिव निषेवितुमागतममृतांशुबिंबयुगम् ॥ १८ ॥

हिम० । ततस्ततः ।

कौशि० ।

गीतिः ।

आयामिनोस्तदक्ष्णोरंजनरेखाविधिं वितन्वंत्याः ।
पाणिः प्रसाधिकायाः प्रापदपांगं चिरेण विश्रम्य ॥ १९ ॥

हिम० । ततस्ततः ।

कौशि० ।

गीतिः ।

तस्या ललाटसीमनि चंदनपंकेन मेनया लिखितम् ।
आसीत्सितातपत्रं तिलकमनंगस्य दर्शितच्छायम् ॥ २० ॥

हिम० । ततस्ततः ।

कौशि० ।

आर्या.

कमनीय रत्नभूषणभूषित तत्कर्ण जो मनोहारी ।
रत्नप्रसूनशोभित शंखनिधीतेंहि तो तिरस्कारी ॥ १७ ॥

हिम०.–मग पुढें?

कौशि०.–

आर्या.

मोत्यांचीं तानवडें लेवविलीं कर्णपालिच्या खालें ।
वाटे मुखकमलातें सेवाया चंद्रबिंबयुग आलें ॥ १८ ॥

हिम०.–मग पुढें?

कौशि०.–

आर्या.

अति दीर्घ नेत्र तीचे करितां अंजनविधी सखी भागे ।
इकडुनि तिकडे नेतां बोट विसांवाचि घ्यावया लागे॥१९॥

हिम०.–मग पुढें ?

कौशि०.–

आर्या.

तीच्या ललाटभागीं मातेनें तिलक चंदनें केला ।
तो मदनाच्या श्वेतच्छत्राच्या देतसेचि शोभेला ॥२०॥

हिम०.–मग पुढें?

कौशि०.–

गीतिः ।

आगुल्फलंबमस्याः कुंतलमंतर्निगूढमंदारम् ।
संयम्य चतुरबंधं सखीजनः स्तिमितनेत्रमास्त चिरम् ॥२१॥

**हिम०** । ततस्ततः ।

**कौशि०** ।

गीतिः ।

अंगं भूषणनिकरो भूषयतीत्येष लौकिको वादः ।
अंगानि भूषणानां काममि सुषुमामजीजनन्तस्याः ॥ २२ ॥

**हिम०** । यद्येवं तत्सम्यगलंकृता वत्सा तद्भवत्या संनिधिविशेषेण ।

नेपथ्ये ।

श्लोकः ।

भ्राम्यन्मंदरकंदराहतिचलत्क्षीरोदपूरोदर-
स्फूर्जद्वीचिपरंपराकलकलप्राचंडवैतंडिकः ।
निर्घोषैः कुलशैलगह्वरगुहारंध्राणि वाचालय-
न्दिव्यः कश्चन दुंदुभिः पररवः साटोपमाहन्यते ॥२३॥

सर्वे ससंभ्रममाकर्णयंति । पुनर्नेपथ्ये ।

आर्या.

आगुल्फलंब कुंतल त्यांमध्यें गुंफिलीं फुलें रुचिर।
वेणीकडे सखीजन पाहोनि स्तिमित राहिला सुचिर ॥२१॥

**हिम०.**—मग पुढें ?

**कौशि०.**—

आर्या.

आंगातें शोभवितो भूषणसमुदाय ही वृथा वाणी।
आंगचि हिचें सुशोभा भूषणनिकरास निश्चयें आणी ॥२२॥

**हिम०.**—असें आहे तर वत्सेचा अलंकारप्रकार चांगलाच झाला. तोही विशेषें करून तुझ्या सांनिध्यानें. (इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो.)

श्लोक.

वेगें फीरवितां सुरासुरजनीं दुग्धाब्धिपूरीं महा
जैसा मंदर पर्वतध्वनि उठे तैसाचि गंभीर हा।
मोठ्यानें कुलशैलगव्हरगुहांमध्यें पहा गाजतो
कोणाचा तिकडे महारव असा हा दुंदुभी वाजतो ॥२३॥

(सर्व संभ्रमानें कान देऊन ऐकतात.) पुन्हा पडद्याबाहेर शब्द होतो.)

श्लोकः ।

जंभारे भव पार्श्वतः परिसरेणायाहि लक्ष्मीपते
वेधः स्वस्त्ययनान्यधीष्ट मुनयः प्रब्रूत रौद्रीमृचम् ।
चंद्रार्कावपि चामरे विधुनुतां छत्री भवाहीश्वर
प्रष्टा रुद्रगणाः प्रयात पवन स्पंदस्व मंदोदयः ॥ २४ ॥

**हिम०** । भगवन्नारद कोयं देवानामिव कोलाहलः श्रूयते ।

**नारदः** । सकलजगदुत्पत्तिस्थितिप्रलयैरुद्घुष्यमाणमहिमा चराचरगुरुस्ते जामाता चटुलविवाहवेषमास्थाय सह देवगणैरित एवाभिवर्तते । अयं कलकलस्तत्पुरःसरनंदिनः प्रोत्सारणायाः । तद्भवानर्घ्यपाणिः प्रत्युद्यातु भगवंतमिंदुशेखरम् । ततः प्रविशति गृहीतविवाहवेषः शंकरो देवलोकश्च ।

**शंकरः** । शार्ङ्गिणं प्रति । अमरावतीमतिक्रम्य शोभते पुरमिदमोषधिप्रस्थम् ।

**शार्ङ्गी** । किं परिहीयते महेंद्रान्महीमहेंद्रः ।

**हिम०** । अर्घ्यपाणिरुपसर्पति ।

श्लोक.

इंद्रा डाविकडेस चाल उजवा चालो पती[1] लक्ष्मिचा
वेधो[2] स्वस्त्ययनें पढो मुनिहि ते बोलोत रौद्री[3] ऋचा।
भानूचंद्र धरोत शुभ्र चवऱ्या छत्रा अहीचा[4] पती
जावें[5] रुद्रगणीं पुढें पथ धरो वायूहि मंदा गती ॥ २४ ॥

**हिम०**.–भगवन्नारदमुने, देवसमुदायाच्या शब्दासारखा हा कोलाहल कोणाचा ऐकूं येतो बरें?

**नार०**.–हा सकल जगाच्या उत्पत्तिस्थितिप्रलयरूप कर्मांनीं ज्याचा महिमा त्रैलोक्यांत गाजला आहे, जो चराचर विश्वाचा गुरु, तुझा जामाता विवाहवेषधारण करून देवगणासहवर्तमान इकडे येत आहे त्याच्या अग्रभागीं नंदी, जनांची दाटी दूर करीत आहे त्याचा कलकलाट चालला आहे. तर आतां तूं लवकर ऊठ आणि हातांत अर्घ्यपात्र घेऊन शंकरास सामोरा हो. (तदनंतर विवाहवेषधारण केलेला शंकर आणि देवलोक येतात.)

**शंकर०**.–( शार्ङ्गीप्रत ह्मणतो. ) हे विष्णो, अमरावतीला मागें सारून हें औषधिप्रस्थनगर शोभत आहे.

**शार्ङ्गी०**.–महेंद्रापेक्षां हा महीमहेंद्र कमी आहे असें नाहीं.

**हिम०**.–( अर्घ्यपात्र हातीं घेऊन शिवासमोर जातो. )

---

१ विष्णु. २ ब्रह्मदेव. ३ रुद्रसूक्त. ४ शेष. ५ चालावें.

**शंक०** । अवलोक्य । अभ्युद्गच्छति मामगाधिराजः तद्वाह-
नादवरुह्य यास्यामः । तथा करोति ।

**हिम०** ।

श्लोकः ।

आचार्मणानामपि दूरमक्षणा-
मकर्तृकाणां वचसामभूमिम् ।
जामातरं लब्धुममुं गिरीशं
कियंति पुण्यानि मया कृतानि ॥ २५ ॥

इत्युपसर्पति ।

**शंकरः** । विलोक्य ।

श्लोकः ।

अतिगुरुचरणक्रमैर्वितन्व-
न्नवनमितोन्नमितस्थलामिवोर्वीम् ।
विनयमुपदिशन्निवात्मभाजा-
मयमुपसर्पति मामगाधिराजः ॥ २६ ॥

**हिम०** । अर्घ्यमुपहरति ।

**शंकरः** । सप्रणामं गृह्णाति ।

**शंकर०.**–( अवलोकन करून ) अहो, हा नगाधिराज मला सामोरा येत आहे. तर आतां आपण वाहनावरून उतरून पायांनीं चालावें हें बरें. (तसेंच करितो.)

**हिम०.**–( मनांत ह्मणतो. )

श्लोक.

जो चर्मनेत्रीं न दिसावयाचा
वर्णावया ज्यास शके न वाचा ।
तो शंभु जामात मिळावयाला
पुण्यें किती आचरलों तपाला ॥ २५ ॥

(असें ह्मणून जवळ जातो.)

**शंकर.**–( पाहून ह्मणतो. )

आर्या.

गुरुचरणाच्या भारें
पृथ्वीस नतोन्नतत्व हा देतो ।
सत्कारार्थ मजकडे
विनयेंचि नगाधिराज हा येतो ॥ २६ ॥

( असें ह्मणून हिमवानाच्या अभिमुख जातो. )

**हिम०.**–(अर्घ्य द्यावयास लागतो.)

**शंक०.**–(प्रणामपूर्वक अर्घ्य ग्रहण करितो.)

**हिम०** । सलज्जं मुखमवनमयति । जामातरं पुरस्कृत्य हरिविरंचिमुखाः परिक्रामंति ।

**ब्रह्मा** । भगवन्कुत्र वैवाहिकी वेदी ।

**हिम०** । इत इतो भवंतः । सर्वे उपसर्पंति ।

**बृहस्पतिः** । हिमवन्प्रत्यासन्नो मुहूर्तः । ततः प्रविशति जयाविजयाभ्यां सह पार्वती ।

**पार्वती** । अज्ज क्खु मे मणोरहकप्पद्दुमो फळं दंसेइ । (१)

**जया** । सस्मितम् । हळा पव्वई एत्तिअं तुह प्पिअसहिओ विवअं जाआ । (२)

**पार्वती** । सासूयम् । हळा विजए किं एसा भणइ । (३)

**विजया** । हळा पव्वई एसा सरसालापपेसलत्तणं दंसेइ । (४) इत्युपसर्पंति ।

**ब्रह्मा** । शार्ङ्गिणं प्रति । भगवन् सर्वे देवाः सह भूतगणैर्यथास्थानमुपविशंतु । सर्वे तथा कुर्वन्ति ।

**हिम०** । अस्मत्पक्षाः कुलपर्वताश्च कैलासेन समं वामपार्श्वमुपविशंतु । कुलपर्वताश्च तथा कुर्वन्ति ।

---

१ अद्य खलु मे मनोरथकल्पद्रुमः फळं दर्शयति ।
२ हळा पार्वति एतावत्तव प्रियसख्यावपि आवां जाते ।
३ हळा विजये किं एषा भणति ।
४ हळा पार्वति एषा सरसालापपेशलत्वं दर्शयति ।

**हिम०.**—(लाजून मुख खालीं करितो.) (जांवयास पुढें करून ब्रह्मा, विष्णु इत्यादि देव पुढें जातात.)

**ब्रह्मदेव.**—भगवन्, विवाहाची वेदी (बहुलें) कोठें आहे?

**हिम०.**—असें इकडून यावें. ( सर्व पुढें जातात.)

**बृहस्पति.**—हिमवंता, मुहूर्तसमय जवळ आला, कन्येला लवकर आणवा. (तदनंतर जयाविजया यांसहवर्तमान पार्वती येते.)

**पार्वती.**—आज खचित माझा मनोरथकल्पद्रुम फळ दाखवितो.

**जया.**—(किंचित् हास्य करून) अगे पार्वती, तुझ्या सारख्या तुझ्या सख्या ज्या आह्मी त्या आमचाहि मनोरथ पूर्ण झाला.

**पार्वती.**—(ईर्ष्येनें.) कायगे विजये, ही काय ह्मणते ?

**विजया.**—अगे पार्वती, ही मधुरभाषणाचें कौशल दाखविते. दुसरें कांहीं नाहीं. (जवळ जाते. )

**ब्रह्मदेव.**—(शार्ङ्गीप्रत.) भगवन् सर्व देवांनीं आणि भूतगणांनीं आपापल्या योग्यस्थानीं उजवेकडे बसावें. (सर्व तसें करतात.)

**हि०.**—आह्मांकडील कुलपर्वत कैलासासहवर्तमान डावेकडे बसोत. (कुलपर्वत तसें करतात.)

**शंकरः** । पार्वतीं विलोक्य । आत्मगतम् ।

गीतिः ।

**एषा विशेषरम्या विवाहवेषेण मोहनेन दृशा ।**
**प्रतिभाति मानसे मे मदनसहस्राणि कल्पयंतीव ॥ २७ ॥**

**बृह०** । भो शंकर वध्वा सहास्यां वेदिकायां प्राङ्मुखो वर्तेथाः ।

**शंकरः** । पार्वत्या सहोपविशति । आत्मगतम् ।

गीतिः ।

**नंदितनयनचकोरा नवनवलावण्यकौमुदीविसरा ।**
**उत्कूलयति मनो मे जलधिं सैषा कलेव चांद्रमसी ॥ २८ ॥**

**बृह०** । अग्निमुपसमाधाय । शंकर त्वदीयेन पाणिना पार्वत्याः पाणिमवलंबस्व ।

**शंकरः** । तथा करोति ।

**पार्वती** । पुलकोद्भेदमभिनयति ।

**शंकरः** । आत्मगतम् ।

गीतिः ।

**आभाति बालिकेयं पाणिस्पर्शेन पुलकितावयवा ।**
**अभिनववसंतसंगादाविर्मुकुलेव बालचूतलता ॥ २९ ॥**

**शंकर.**–(पार्वतीकडे पाहून मनांत ह्मणतो.)

आर्या.

**ही जातीनें रम्या विवाहवेषेंकरूनियां फार।**
**शोभे मज वाटतसे कीं ही निर्मोल मन्मथ हजार॥ २७॥**

**बृह०**–अहो शंकरजी, वधूसहवर्तमान ह्या वेदीवर पूर्वाभिमुख बसावें.

**शंकर.**–( पार्वतीसहित तसा बसतो; आणि मनांत ह्मणतो.)

आर्या.

**हर्षवि नयनचकोरा पाडी लावण्य कौमुदी जाला।**
**ही चंद्राचीच कला वाढविते मन्मनोजलधि बाला॥ २८॥**

**बृह०.**–( अग्नीच्या समीप वधूवरांस बसवून.) अहो शंकरजी, तुह्मी आपल्या हातानें पार्वतीचा हात धरा.

**शंकर.**–(तसें करतो.)

**पार्वती.**–( शंकराच्या हस्तस्पर्शानें आंगावर रोमांच उठले असें दाखविते.)

**शंकर.**–( आपल्या मनांत ह्मणतो.)

आर्या.

**मत्पाणिस्पर्शानें पुलकांकित देह जाहली बाला[1]।**
**भासे वसंतसंगें चूतलतेलाचि[2] मुकुलभर[3] आला॥ २९॥**

१ पार्वती. २ आम्रलतेला. ३ मोहराचा भर.

**ब्रह्मा** । वधूवरौ पावकं प्रदक्षिणां कुरुताम् ।

**उभौ** । तथा कुरुतः ।
**पार्वती** । शंकरमवलोकयाति ।
**शंकरः** । प्रत्यवलोकयति ।
**पार्वती** । दृष्टिं परावर्तयति ।
**शंकरः** । आत्मगतम् ।

गीतिः ।

**अवलोकनाय लोला दृष्टिरियं मृगदृशो निवृत्तिमती ।**
**गत्वा प्रतिप्रवाहं राजति शफरी निवर्तमानेव ॥ ३० ॥**

**बृह०** । पार्वत्याः पाणिना लाजांजलिं कारयाति ।
**पार्वती** । धूमाक्रमेण वैक्लव्यं निरूपयति ।

**शंकरः** । आत्मगतम् ।

श्लोकः ।

**प्रस्विन्नगंडफलकच्युतपत्रलेखं**
**धूमानुषंगगलितांजनपाटलाक्षम् ।**

**ब्रह्मदेव.**—अहो वधूवरांनो, आतां तुह्मी दोघें बरोबर अग्नीला प्रदक्षिणा करा.

**दोघें.**—( वधूवर तसें करतात. )

**पार्वती.**—( शंकराकडे पाहते. )

**शंकर.**—( पार्वतीकडे पाहतो. )

**पार्वती.**—( लाजून दृष्टि परतविते. )

**शंकर.**—( मनांत ह्मणतो. )

आर्या.

**मज देखाया लोला दृष्टि हिची असुन परतली तैशी ।**
**ओघां[1]कडे अभिमुखी होउनि शफरी[2] निवर्तते जैशी ॥ ३० ॥**

**बृह०.**—( पार्वतीची ओंजळ लाह्यांनीं भरतो. )

**पार्वती.**—(होमधूम्र डोळ्यांस लागून व्याकुळ झाल्यासारखें करिते.)

**शंकर.**—( आपल्या मनांत ह्मणतो.)

दिंड्या.

**अग्नितापें गालास घाम आला ।**
**पत्र[3]लेखहि त्यां[4]वरील मंद झाला ॥**
**धूमसंगें नेत्रांस उदक आलें ।**
**तयायोगें अंजन[5] भ्रष्ट[6] झालें ॥ १ ॥**

---

१ प्रवाहाकडे. २ मच्छी. ३ वेलबूट. ४ गालावरील. ५ काजळ. ६ वाहून गेलें.

म्लायद्वसंतकुसुमं मुखमायताक्ष्या-

श्चित्ते ममार्पयति कामपि रागमुद्राम् ॥ ३१ ॥

**बृह०** । शंकर पार्वत्याः पादकमलं पाणिभ्यामश्मानमारोपयतु भवान् ।

**शंकरः** । स्मयमानमुखस्तूष्णीं तिष्ठति ।

**कुलपर्वताः** । ससंभ्रमम् । भगवन्प्रमाणभूतेन पुरोधसा यदुच्यते तदनुष्ठीयताम् ।

**भूतगणाः** । ससंरंभम् । कुलपर्वताः कथमिव नियम्यते त्रिभुवननियंता नीललोहितः ।

**ब्रह्मा** । सस्मितम् । उभयान्निवार्य । सकलजननियामिका स्वतःप्रमाणभूता श्रुतिरेव सम्यगित्थमभिदधाति । तद्यथोक्तमनुष्ठीयताम् ।

**शंकरः** । संकुचिताभ्यां पाणिभ्यां पार्वत्याः पादकमलमश्मानमारोपयति ।

लाल झालीं लोचनें मत्सखीचीं ।
म्लान झालीं पुष्पेंहि मस्तकींचीं ॥
हिच्या आली वदनास फार शोभा ।
चित्त माझें पाहोनि धरी लोभा ॥ २ ॥ ३१ ॥

**बृह०**—अहो शंकरजी, आपण पार्वतीचें पादकमल दोहों हातांनीं धरून अश्म्यावर[1] स्थापावें.

**शंकर.**—(किंचित् हास्य करून उगाच बसतो.)

**कुलपर्वत.**—(आग्रहानें.) भगवन् शंकरा, हे उपाध्येबावा आपणास प्रमाण. ते सांगतील तसें केलें पाहिजे.

**भूतगण.**—(ईर्ष्येनें.) अहो कुलपर्वत हो, जो त्रिभुवनाचा नियंता नीललोहित त्याचें नियमन करावयास पाहतां काय ? हें कसें बोलतां !

**ब्रह्मदेव.**—(हास्य करून, उभयतांचें निवारण करून, शंकरास ह्मणतो.) सकल जनांचें नियमन करणारी स्वतः प्रमाणभूत जी श्रुति तीच नियमन करिते. तीच असें करावयास सांगते तर तिच्या सांगण्याप्रमाणें आपणास केलें पाहिजे.

**शंकर.**—(मुकाट्यानें आपल्या दोहों हातांनीं पार्वतीचा पाय धरून उचलून साणेवर ठेवितो.)

---

१ साणेवर.

**बृह०** । कर्मशेषं समापयन्वधूवरौ ब्रह्माणं प्रणमयति ।

**ब्रह्मा** । हस्तमुद्यम्य ।

गीतिः ।

**सकलजगतां सवित्रोरनन्यसामान्यमस्तु वां प्रेम ।**
**भुवनभयभंगदक्षो भवतु कुमारोपि तारकध्वंसी ॥ ३२ ॥**

इत्याशिषं प्रयुंक्ते ।

प्रविश्य वृद्धपुरंध्र्यः ।

गीतिः ।

**अण्णोण्णसमसरीराणं अण्णोण्णप्परूढपम्माणं ।**
**जोण्हाणिसाअराणं तुम्हाणं होदु कोवि अणुराओ ॥ ३३ ॥**

इत्यार्द्राक्षतारोपणमाचरंति ।

**नारदः** । उत्थाय सांजलिबंधं । भगवन्देवकार्यहेतोः कृतापराधं कंदर्पं पुनर्गृहीतवपुषं पदकमलसेविनं च भवाननुगृह्णीयताम् ।

---

१ अन्योन्यसमशरीरयोरन्योन्यप्ररूढप्रेम्णोः ।
ज्योत्स्नानिशाकरयोर्युवयोर्भवतु कोप्यनुरागः ॥

बृह०–(कर्मशेष समाप्त करवून वधूवरांकडून ब्रह्मदेवास नमस्कार करवितो.)

ब्रम्हदेव.–( हात वर करून. )

आर्या.

**त्रिजगज्जनकेंच तुह्मी तुमचा प्रेमा सदा नवा राहो।**
**पुत्र तुम्हांस जगद्भयहारक मारकही तारकांचा[1] हो ॥ ३२ ॥**

( असा आशीर्वाद देतो. ) (इतक्यांत वृद्धास्त्रिया येतात.)

वृद्धास्त्रिया.–( हातांत अक्षता घेऊन. )

आर्या.

**अन्योन्यसमशरीरें अन्योन्य प्रेमही तसें राहो ।**
**ज्योत्स्नानिशाकरांचा[2] तैसा तुमचा समागम सदा हो ॥ ३३ ॥**

( असें ह्मणून अक्षतारोपण करितात. )

नारद.–( उठून हात जोडून प्रार्थितो. ) भगवन् देवाधिदेव, देवांच्या कार्याकरितां अपराध करणारा कंदर्प भस्मसात् झाला आहे तो पुनः पूर्ववत् शरीर धारण करून आपल्या पदकमलाची सेवा करील असा अनुग्रह त्या गरीबावर करावा.

१ तारकासुराचा हंता. २ चंद्रिका आणि चंद्र यांचा.

**शंकरः** । यथा रोचते तथा भवतु । ततः प्रविशति रतिवसंताभ्यां सह पूर्वाधिकविग्रहः कामः । सर्वे निरूपयंति ।

श्लोकः ।

**माधुर्यसौरभतरंगितचापबाणः**
**सख्युः करं समवलंब्य शनैरनंगः ।**
**आयाति रुद्रनयनानलदग्धकायः**
**पूर्वाधिकः कथमहो ललनासमेतः ॥ ३४ ॥**

सर्वे विस्मयं निरूपयंति ।

**हिम०** । सहर्षं यथा ।

श्लोकः ।

**पुण्यैरेव पुरातनैरुपनतैर्देवेन विश्वात्मना**
**पुत्री भूरिगुणावदातचरिता पाणौ गृहीता मम ।**
**देवानां च मनोरथः परिणतः प्राप्यानवद्यं वपु-**
**र्लोकानंदकरः स्मरोपि नयनातिथ्यं विधत्ते पुनः ॥ ३५ ॥**

**शंकरः** । किमतःपरं ते प्रियमस्ति ।

**हिम०** । समधिगतसकलमनोरथानां किमतःपरं प्रार्थनीयम् । तथापीदमस्तु । भरतवाक्यम् ।

**शंकर.**—जसें तुह्मांला आवडतें तसेंच असो. (तदनंतर रति आणि वसंत यांसहवर्तमान काम पहिल्यापेक्षां अधिक रमणीय देह धारण करून येतो.) (सर्व त्याकडे पाहतात.)

श्लोक.

**घेऊनि पुष्पमय बाण धनू करानें**
**संगें वसंत रति चालवि आदरानें।**
**होता महेशनयनानळिं दग्ध झाला**
**पूर्वाधिक स्मर पहा परतोनि आला ॥ ३४ ॥**

(सर्व पाहून विस्मय करितात.)

**हिम०**—(हर्ष पावून.)

श्लोक.

**पुण्यें प्राचीन होतीं पदरिं ह्मणवुनी आज या शंकरानें**
**कन्याही धन्य केली धरुनि गुणवती पाणि हीचा करानें**
**देवांची कामनाही त्वरितचि अवघी पावली शेवटाला**
**जो भस्मीभूत त्याही रुचिरतर तनू प्राप्त झाली स्मराला ॥३५॥**

**शंकर.**—आणखी तुझें इष्ट काय असावें ?

**हिम.०**—सकलमनोरथ पूर्ण झाल्यावर मागावयाचें अवशिष्ट काय राहिलें आहे ? तथापि हें असो. भरतवाक्य.

श्लोकः ।

पर्जन्यो वृष्टिमिष्टां प्रदिशतु जगतो भद्रसंपादयित्रीं
शश्वत्सस्यैः प्ररूढैर्भवतु पुलकिता सर्वतो भूतधात्री ।
वर्धतां वीतविघ्नाः स्फुरदुपकृतयः संपदः सज्जनानां
नित्यानंदो महेशो निरतिशयसुखप्राप्तये कल्पतां वः ॥ ३६ ॥

इति निष्क्रांताः सर्वे ।

इति पार्वतीपरिणये नाटके पंचमोंकः ॥

समाप्तमिदं बाणकविकृतं पार्वतीपरिणयं नाम नाटकम् ।
श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु ।

---

बाणकवेरेवेदं सुभाषितं पद्यद्वयम् ।

अकारणाविष्कृतवैरदारुणा-
दसज्जनात्कस्य भयं न जायते ।
विषं महाहेरिव यस्य दुर्वचः
सुदुःसहं संनिहितं सदा मुखे ॥ १ ॥
सुभाषितं हारि विशत्यधो गला-
न्न दुर्जनस्यार्करिपोरिवामृतम् ।

श्लोक.

होवो पर्जन्यवृष्टी सुसमयिंच जगा भद्रसंपादयित्री
सस्यांनीं पूर्ण आच्छादित सतत असो सर्वभागीं धरित्री ।
संपत्ती सज्जनांची उपकृतिनिरता वृद्धि निर्विघ्न पावो
हा नित्यानंद शंभू निरतिशयसुखप्राप्ति सर्वांस देवो ॥३६॥

( असें झाल्यावर सर्व निघून जातात. )

पांचवा अंक समाप्त.

बाणकविकृत पार्वतीपरिणयनामक संस्कृतनाटक याचें प्राकृत भाषांतर समाप्त.

---

सुभाषित आर्या.

निष्कारण वैर धरी दुर्जन जो त्यास कोण भीत नसे ।
अहिच्या विषसें त्याच्या दुःसह दुर्वच सदा मुखांत वसे ॥१॥
दुर्जन सुभाषिताला कंठीं अमृतास राहुसा न धरी ।
त्यातें सज्जनहृदयीं धरितो कौस्तुभमण्यास जेंवि हरी ॥२॥
संस्कृत काव्याचें मी भाषांतर धैर्य धरुनि जरि करितों ।
तरि अल्पमतित्वास्तव सुमहाजनभीति मानसीं धरितों ॥३॥

तदेव धत्ते हृदयेन सज्जनो
हरिर्महारत्नमिवातिनिर्मलम् ॥ २ ॥



श्लोक.

सौवर्ण पात्रीं सुरसास गोडी जी तीहुनि पर्णपुटीं न थोडी ।
असेल तें दुर्लभ पात्र ज्याला ती येथ सारीच मिळेल त्याला ॥

पुण्यग्रामीं केलें भाषांतर परशुरामतात्यानें ।
विद्वज्जनांस आदरपूर्वक भावें समर्पिलें त्यानें ॥ ५ ॥

